# सार्थ अमृतानुभव
आणि
# चांगदेवपासष्टी



संपादक

**ह. भ. प. दत्तराज देशपांडे**

साहित्य विशारद, राष्ट्रभाषारत्न,
मराठी, हिंदी, इंग्रजी कीर्तनालंकार



**किंमत ३५ रुपये**



सारथी प्रकाशन, पुणे ४११ ०३०.

**प्रकाशक :**
मिलिंद रा. जोरी
सारथी प्रकाशन
१००५ सदाशिव पेठ,
पुणे - ४११ ०३०.







**मुद्रक :**
रा. शं. जोरी
इंदिरा प्रिंटिंग प्रेस
१००५ सदाशिव पेठ,
पुणे - ४११ ०३०.

**अंतरंग -**

गुरु श्रीनिवृत्तिनाथांनी श्री ज्ञानेश्वरांस उपदेश केला की, 'तू स्वतःच्या बुद्धीने अमृत म्हणजे अखंड ब्रह्मसज्ञितवस्तू की जी सर्वव्यापी, सर्वकाल, सर्वावस्थेत नित्य अपरोक्ष स्वतः सिद्ध आहेत तिचा अनुवाद कर.'

आणि तोच अलौकीक ग्रंथ अमृतानुभव त्यातून निर्माण झाला.

पत्र पाठविताना सुरुवात कशी करावी या संभ्रमात श्रीचांगदेवाने काहीशा गूढार्थाने श्रीज्ञानदेवास कोरे पत्र पाठविले. ते पाहाताच सद्गुरू निवृत्तिनाथांच्या आज्ञेवरून त्यास उत्तर म्हणून जे दिले गेले आहे, तेच हे पासष्ट ओव्यांचे श्री चांगदेव पासष्टी म्हणून प्रख्यात आहे.

**– प्रकाशक**





आतां ज्ञानदेवो म्हणें । श्री गुरुप्रणामें येणें ॥
फेडिलीं वाचा ऋणें । चौहीं वाचांची ॥

# सार्थ अमृतानुभव

## प्रकरण पहिलें

### श्लोक

यदक्षरमनाख्येयमानंदमजकेवलम् ॥ श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ॥ १ ॥ गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्या हि शांकरी ॥ जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरंतरम् ॥ २ ॥ सार्धकेन च कस्यार्धे शिवयोः समरूपिणोः ॥ ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ॥ ३ ॥ अद्वैतमनस्तत्त्वं दर्शयन्तौ मिथस्तराम् ॥ तौ वन्दे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ॥ ४ ॥ मूलायाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये ॥ क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शंभवे ॥ ५ ॥

---

या प्रकरणाच्या सुरुवातीस श्रीज्ञानेश्वर महाराज आपल्या सद्गुरूंना वंदन करतांना म्हणतात–श्रीमान् महायोगी श्रीनिवृत्तिनाथ हे ( माझे सद्गुरु ) दैवत निर्विकार आणि आनंदरूप आहे. त्याला उत्पत्ति नाही, त्याला नाशहि नाहीं. त्या दैवतांचें वर्णन करतां येत नाहीं. त्या दैवताचा मी आश्रय घेतों. १. या जगांत सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ आणि आनंद देणाऱ्या ज्ञानरूप ब्रह्मविद्येचा जयजयकार असो. दयाळू विद्यामाउलीला मी वंदन करतों. २. शिवशक्तीच्या रूपांत द्वैताचा एकसारखेपणामुळें आभास होतो. ह्या दोहोंपैकीं कोणाच्या आश्रयानें दुसरे कोण आहे हें समजणें, तसेंच यांतील सार्ध कोण हें कळणेंहि दुरुपास्त आहे. ३. ब्रह्म या आपल्या मूळ स्वरूपाच्या बाबतींत शिव आणि शक्ति दोघेहि अभिन्नता दाखवितात. हीं दोन्हीं जगतांचें मूळ कारण आहेत. या दोघांच्या मूळ स्वरूपाचा म्हणजेच ब्रह्मस्वरूपाचा लाभ व्हावा यासाठीं मी शिवशक्तीला नमन करतों. ४. विश्वाच्या आरंभाला, अस्तित्वाला आणि विलयाला श्रीशंभु हाच कारण आहे. निमित्तोपादनहि तोच आहे म्हणून आदि-मध्य-अंत अभिन्नत्वानें तोंच आहे. पण हीं सारीं त्याच्या ठिकाणीं नाहींतच. आपल्या रूपानें परिपूर्ण असणाऱ्या परमात्म्याला मी वंदन करतों. ५.

## ओव्या

ऐशीं हीं निरुपाधिकें । जगाचीं जियें जनकें ॥ तियें वंदिली मिया मूळिकें । देवोदेवी ॥ १ ॥ जो प्रीयुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिये सरोभरी ॥ चारुस्थळीं एकाहारी । एका आंगाची ॥ ॥ २ ॥ आवडीचेनि वेगें । एकएकातें गिळिती आंगें । कीं द्वैताचेनि पांगें । उगाळिते आहाति ॥ ३ ॥ जी एकचि नव्हे एकसरे । दोघां दोपण नाहीं पुरें ॥ काय नेणों साकारें । स्वरूपें जिये ॥ ४ ॥ कैशी स्वसुखाची अळुंकी । जे दोनीपण मिळूनि एकी ॥ नेदेतीच कवतुकी । एकपण फुटों ॥ ५ ॥ हा ठावोवरी वियोगभेडे । जे बाळ जगायेवढें ॥ वियाली परी न मोडे । दोघुलेपण ॥ ६ ॥

---

शिवशक्ति ( देवो-देवी ) जगाचें मूळ कारण असून त्याला उपाधि नाहीं. अशा प्रकारच्या शिवशक्तीला मी नमस्कार केला. १. आपलें एकपण न मोडतां, स्वतःच्या स्वरूपावर प्रेमाच्या एका लहरींत अर्धनारी-नटेश्वराच्या सारखा, हा ईश्वरच शक्तिरूप होतो. २. हीं दोघें एकमेकांचीं रूपें प्रेमभरानें आत्मसात् करतात. मग द्वैत शिल्लक राहत नाहीं. पुनः क्रीडेसाठीं वेगळीं होतात. ३. प्रकृति आणि पुरुष सर्वशः एक आहेत असें म्हणणें खरें नव्हे, तसेंच तीं दोन आहेत म्हणूं तर दोन म्हणण्याइतकीं दोन नाहींत. दोघेहि रूपानें-आकारानें कशी काय आहेत कांहीं उलगडत नाहीं. ४. स्वतःच्या सुखांत रममाण होण्याची यांना इतकी गोडी आहे कीं, विलासासाठीं आपल्याच अधिष्ठानावर स्थिर राहून कौतुकानेंहि आपलें एकपण भंग होऊं देत नाहींत. ५. एकमेकांपासून दूर होण्यास हे नाखूष असतात. जगाएवढें थोर बाळ झाले ते दोघे प्रेम बिघडूं देत नाहींत. वियोगाचें त्यांना भय वाटतें. ६.

**आपुलिये आंगीं संसारा । देखिलिया चराचरा ॥ परी नेदितीच तिसरा । झोक लागों ॥७॥ जया एके मत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ॥ जे अनादि एकपणें । नांदती दोघें ॥ ८ ॥ भेदु लाजोनि आवडी । एकरसीं देत बुडी । जो भोगणया थाव काढो । द्वैताचा जेथें ॥ ९ ॥ जेणें देवें संपूर्ण देवी । जियेवीण कांहींना तो गोसावी ॥ किंबहुना एकोपजीवी । एकएकाची ॥ १० ॥ कैसा मेळु आला गोडिये । दोघे न माती जगीं इये । कीं परमाणूहि माजी उवाये । मांडिली आहाती ॥११॥ जिहीं एकएकावीण । न कीजे तृणाचेंही निर्माण ॥ जिये दोघे जीवप्राण । जिया दोघां ॥ १२ ॥**

---

चराचर सृष्टि आपल्यापासून झाल्याचें पाहूनहि प्रकृतिपुरुष हे जग हा आपल्याशिवाय अन्य पदार्थ आहे असा विचार अंगाला लागूं देत नाहींत. ७. तीं दोघेंहि एकाच प्रकाशानें प्रकाशतात, एकाच अधिष्ठानावर राहतात. अनादिकालापासून एकपणानें राहत आहेत. ८. प्रकृतिपुरुषांमध्यें, आपल्याला भोग व्हावा या इच्छेनें स्वतः भेद द्वैत शोधण्याकरिता गेला; पण त्याला द्वैत तर सांपडलें नाहींच, उलट आपल्या अपकीर्तीला लाजून, त्यांच्या ऐक्यरसामध्यें तो बुडी देतो, म्हणजे भेदच अभेद होऊन जातो. ९. ज्या देवाच्या योगानें देवीला पूर्णपणा आला व जिच्याशिवाय ज्याला गोसावीपणा नाहीं! काय आश्चर्य सांगावें! हीं प्रकृतिपुरुषें परस्परांचीं उपजीव आहेत. १०. या दोघांच्या गोडींतील ऐक्याचें वर्णन काय करावें? हीं दोघेंहि त्रैलोक्यांत ओतप्रोत भरलेलीं असून, परमाणूमध्येंही मोठ्या आनंदानें नांदत आहेत. ११. जीं परस्परांवांचून गवताच्या काडीचीही उत्पत्ति करीत नाहींत. हीं दोघें एकमेकांना जीव कीं प्राण आहेत. १२

**घरवातें मोटकीं दोघें । जैं गोसावी सेजे रिघे ।। तैं दंपत्यपणें जागे । स्वामिणी जे ।। १३ ।। जया दोघांमाजी एकादे । विपाये उमजले होय निदे ।। तरी घरवात गिळुनी नुसधें । कांहींना करी ।। १४ ।। दोन्हीं आंगाचो आटणी । गिंवसित आहाती एक-पर्णी । जालीं भेदाचिया वाहणी । आधार्धी जियें ।। १५ ।। विषो एकमेकांची जिये । जिये एकमेकांची विषयीं इये ।। जिहीं दोघीं सुखिये । जिये दोघे ।। १६ ।। स्त्रीपुरुष नामभेदे । शिवपण एकलें नांदे ।। जग सगळें अधाघे-। पणें जिहीं ।। १७ ।। दो दांडी एक श्रुती । दोहीं फुलीं एक द्दति । दोहों दीवीं दीप्ती । एकीची जेवीं ।। १८ ।। दो ओंठीं एकी गोष्टी । दो डोळां एकी सृष्टी ।। तेवीं दोघीं जिहीं सृष्टी । एकीचि जें ।। १९ ।।**

घरादारांत मोजकीं दोघेंच आहेत. म्हणजे सर्व जगत् प्रकृतिपुरुषांनीं व्यापिलेलें आहे. त्यांत जेव्हां पति बिछान्यावर जातो तेव्हां प्रकृति कुटुंबपणानें जागी असते. १३. या दोघांपैकीं एखादें कदाचित् निद्रेंतून जागें झालें तर संसार नाहींसा होतो, व केवळ स्वरूपमात्र शिल्लक राहतें, दुसरें कांहीं नाहीं. १४. येथें प्रकृतिपुरुष आपल्या स्वरूपाचा लय शुद्ध ब्रह्मस्वरूपांत करतात व तींच व्यवहाराकरितां अर्धीं अर्धीं होऊन भेद दाखवितात. १५. जीं परस्पर एकमेकांस विषयविषयीभावानें आहेत, तसेंच जी दोघें एकमेकांमुळें आनंदी आहेत. १६. सर्व जगतांत, स्त्रीपुरुष या नाम-भेदानें एक शिवच नांदत आहे. त्रैलोक्य यांच्या अर्ध्या भागानें भरलेलें आहे. १७. टिपऱ्या दोन, पण नाद एक; फुलें (सजातीय) दोन, पण सुगंध एक; दिवे दोन, पण प्रकाश एक; ओठ दोन, पण गोष्ट जशी एक; डोळे दोन, पण दृष्टि जशी एक; तसें सृष्टीमध्यें प्रकृति-पुरुषांची व्याप्ति आहे, असें म्हणावें मात्र; पण तत्त्वतः विचार केला असतां एक शिवच व्याप्त आहे. १८-१९.

**दाऊनि दोनीपण । एकरसाचें आरोगण । करीत आहे मेहूण । अनादि जे ॥ २० ॥ जे स्वामीचिया सत्ता । वीण असो नेणें पतिव्रता ॥ जियेविण सर्वकर्ता । कांहीं ना जो ॥ २१ ॥ जे कीं भातारार्चे दिसणें । भातारूचि जियेचें असणें ॥ नेणिजती दोघेजणें । निवडूं जिये ॥ २२ ॥ गोडी आणि गुळु । कापूर आणि परिमळू ॥ निवडूं जातां पांगळु । निवाडू होय ॥ २३ ॥ समग्र दीप्ती घेतां । जेवी दीपचि ये हाता ॥ तेवीं जियेचिया तत्त्वतां । शिवूचि लाभे ॥ २४ ॥ जैशी सूर्य मिरवे प्रभा । प्रभे सूर्यत्वचि गाभा ॥ तैशी भेद गिळित शोभा । एकचि जे ॥२५॥ कां बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंबा अनुमापक ॥ तैसें द्वैतमिसें एक । बरवत असे ॥ २६ ॥**

---

आपल्या अनादि स्थितींत द्वैताभास दाखवून ( प्रकृति—पुरुषरूपीं मेहूण ) आपल्या वास्तव स्वरूपाचा अनुभव घेत आहे. २०. शिवाच्या सत्तेशिवाय ज्या शक्तीला पतिव्रतापण नाहीं आणि जिच्यावांचून शिवाला सर्वकर्तेपणा नाहीं. २१. पुरुषाच्या ठिकाणीं जें ज्ञान आणि जी सत्ता आहे, तेंच ज्ञान आणि तीच सत्ता प्रकृतीमध्यें आहे. कोणती याचा निवाडा करतां येत नाही. २२. गूळ आणि त्यांतील गोडी, कापूर आणि त्यांतील सुगंध, यांचा निवाडा करावयास गेलें असतां निवाडाच पांगळा होतो-निवाडा स्वरूपेंकरून उरत-राहत नाहीं. दिव्याचा सर्व प्रकाश ग्रहण करूं गेलें असतां दिवाच हातीं येतो; त्याप्रमाणें शक्तिस्वरूपाचा विचार करूं गेलें असतां शिवाचीच प्राप्ति होते. २३-२४. सूर्याच्या ठिकाणीं प्रभा शोभते; आणि प्रभेला अधिष्ठान सूर्यच आहे, तसा भेद नाहींसा होऊन एक प्रभाच शोभते; किंवा ज्याप्रमाणें बिंब, प्रतिबिंबाचें द्योतक म्हणजे दाखविणारें आहे व प्रतिबिंब बिंबाएवढेंच असतें. प्रकृतिपुरुष अशा द्वैतामिषानें एक परमात्माच विलास करीत आहे. २५-२६.

**सर्व शून्याचा निष्कर्षु । जिया वाइला केला पुरुषु ॥ जेणें दादुलेन सत्ता विशेषु । शक्ति जाली ॥ २७॥ जिये प्राणेश्वरी-वीण । शीवींहि शीवपण । थारों न शके ते आपण । शीवें घडली ॥२८॥ ऐश्वर्येंशी ईश्वर । जियेचें अंग संसारा । आपण होउनि उभारा । आपणचि जें ॥ २९॥ पतीचेनि अरूपपणें । लाजोनि अंगाचें मिरवणें ॥ केलें जगायेवढें लेणें । नामरूपाचें ॥ ३० ॥ ऐक्याचाहि दुकाळा । बहुपणाचा सोहळा ॥ जिये सदैवेचिया लीळा । दाखविला ॥ ३१ ॥ आंगाचिया आटणिया । कांतु उवाया आणिला जिया । स्वसंकोचें प्रिया । रुढविली जेणें ॥ ३२ ॥**

सर्व शून्याचा म्हणजे सर्व दृश्य पदार्थांचा निषेध करून ज्या परमात्म्याचा निषेध सांगितला नाहीं, असा जो परमात्मा, तो सर्व शून्याचा निष्कर्ष म्हणजे परमावधि होय. त्या परमात्म्याला ज्या बाईनें पुरुषत्वाला आणलें, त्याच नवऱ्याच्या सत्ताविशेषाला घेऊनच तिला शक्तिपणा आला. २७. ज्या प्रकृतीवांचून शिवाच्या ठिकाणीं शिवपणा नाहीं अशा त्या प्रकृतीला शिवानें निर्माण केली, म्हणजे आपल्या ठिकाणीं धारण केली. २८. ज्या प्रकृतीनें आपल्यापासून आकाशादि सर्व संसाराची उत्पत्ति केली, आणि आपल्याच कर्तृत्वानें ईश्वराला ऐश्वर्याला आणून आपली स्वतःची सिद्धि आपणच केली. २९. नामरूपशून्य परमात्मा आपला पति आहे हें पाहून प्रकृतीला लाज वाटली, आणि मग तिने नामरूपात्मक जगत् हाच कोणी एक मोठा अलंकार आपल्या स्वतःच्या ऐश्वर्यानें बनविला. ३०. ज्या परमात्म्याच्या ठिकाणीं ऐक्याचा सुद्धां दुष्काळ आहे, त्या ठिकाणीं त्या भाग्यवान् बायकोनें आपल्या सहज लीलेनें बहुपणाचा सोहळा दाखविला. ३१. या प्रकृतीनें आपल्या अंगाची आठणी करून परमात्म्याला उत्कर्षाला आणलें खरें, पण आपल्या स्वरूपाचा संकोच करून घेतला आहे, म्हणूनच ती जगांत नांदत आहे. ३२.

**जियेतें पहावयाचिया लोभा । चढे द्दष्टत्वाचिया क्षोभा ॥ जियेतें न देखतुचि उभा । आंगचि सांडी ॥ ३३ ॥ कांतेचिया भिडा । अवला होये जगायेवढा ॥ अंगविला उघडा । जियेवीण ॥३४॥ जो हा ठाव मंदरूपें । उवाइलेपणें हारपे ॥ तो जाला जियेचेनि पडपें । विश्वरूप ॥३५॥ जिया चेवविला शीवु । वेद्याचें बोणें बहु ॥ वाढितेणेंशी जेउ । धाला जो ॥ ३६ ॥ निदेलेनि भातारें । जे वियें चराचरें ॥ जियेचा विसावला नुरे । आंबुलेपणही ॥३७॥ जंव कांत लपों बैसे । तंव नेणिजे जियोदेशें ॥ जिये दोघे आरिसे । जिया दोघा ॥ ३८ ॥**

---

प्रकृतीला पाहण्याच्या इच्छेनें पुरुष द्रष्टा बनतो म्हणजे द्रष्टत्वदशेला येतो आणि ती दिसली नाहीं तर उभ्या उभ्या अंग टाकतो ! ३३. पत्नीच्या भिडेने पति जगाएवढी मोठी उपाधि आवरणारा होतो आणि तिच्यावांचून उघडा दिसतो. माया नाहींशीं झाल्याबरोबर जीवेश्वरादि सर्व जगत् नष्ट होते व परमात्माच शिल्लक राहतो. ३४. आपल्या स्वरूपानंदानें परमात्मा इतक्या सूक्ष्म भावाला येतोसा दिसतो म्हणजे सामान्यरूपानें सर्वव्यापक होऊन प्रकृतीच्या शोभेनें विश्वरूप बनतो ३५. ज्या प्रकृतीनें, वेदरूपी पक्वान्नाच्या भोजनाकरितां पुरुषाला जागा केला, पण तो जागा झाल्याबरोबर वाढणारिणीसुद्धां विश्वरूपीं सर्व पक्वान्नें खाऊन टाकून तृप्त झाला म्हणजे शुद्ध अब्रह्मच स्वरूपानें शिल्लक राहतें. ३६. पुरुष निजला असतां प्रकृति चराचर जगताला प्रसवते आणि ती लयाला गेली म्हणजे त्याचा पुरुषपणा राहत नाहीं. ३७. पुरुष हिच्याकरितां विशेष रूपाचें निरोधन घेतो, तेव्हा तो विशेषरूपानें कळून येत नाहीं. परस्परांना प्रकाशित करणारे हे दोन आरसेच आहेत. सारांश, पुरुषाचें ज्ञानस्वरूप प्रकृतीच्या सत्त्वगुणामुळें प्रतीत होते, आणि प्रकृतीचें अस्तित्व पुरुषाच्या सत्तेनें ऊपलब्ध होतें.३८.

जियेचोनि अंगलगें । आनंद आपणा आरोगूं लागे ॥ सर्व-भोक्तृत्वही नेघे । जियेवीण कांहीं ॥३९॥ जया प्रियेचें जें अंग । जो प्रियु जियेचें चांग ॥ कालवूनि दोन्ही भाग । जेविते आहाति ॥ ४० ॥ जैशी कां समीरेसकट गती । कां सोनियासकट कांती ॥ तैशी शीवेशीं शक्ति । अघवीच जे ॥ ४१ ॥ कां कस्तूरीसकट परिमळु । कां उष्मेसकट अनळु ॥ तैसा शक्तीशी केवळु । श्री-शीवूचि जो ॥४२॥ राती आणि दीवो । पातली सूर्याचा ठावो ॥ तैसी आपुलिया साचीं वावो । दोघे जिये ॥ ४३ ॥ किंबहुना तिये । प्रणवाक्षरी विरुढातिये ॥ दशेचीही वैरिये । शीवशक्ति ॥ ४४ ॥ हें असो नामरूपाचा भेदशिरा । गिळित एकार्थाचा उजिरा ॥ नमो तया शीववोहरा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ४५ ॥

---

हिच्या संबंधानेंच शिव आपला आनंद आपण भोगतो आणि ती नसेल तर ह्याला आपला आनंद भोगतां येत नाहीं. ३९. पुरुषाला शोभविण्याला प्रकृतीचें स्वरूप कारण आहे. प्रकृतीला शोभा आणतो परमात्माच. शिव व शिवा एकत्र होऊन द्वैताचा विलास करतात. ४० वायूसह त्याच्या गतीचें ग्रहण होतें, अथवा सोन्यासह त्याच्या कांतीचें ग्रहण होतें किंवा कस्तुरीसह गंध, किंवा उष्णतेसह अग्नि याचें ग्रहण होतें, तसें प्रकृतीसह-वर्तमान केवळ शिवच असतो. ४१–४२. सूर्याच्या घरीं दिवस व रात्र गेलीं असता नाहींशीं होतात, तशीच प्रकृति व पुरुष हीं दोघेंहि अधिष्ठानाच्या ठिकाणीं नाहींतच. ४३. प्रणव म्हणजे ओंकार, त्यांतून निघणाऱ्या जगताचीं हीं दोघेंहि वैरी आहेत. यांच्या वास्तव स्वरूपाच्या विचारापुढें जगाचें अस्तित्व टिकत नाहीं. यापेक्षां अधिक काय सांगावें ? ४४. नामरूपात्मक जगत् हाच कोणीएक द्वैतरूपी शिरा तो खाऊन टाकून अवशेष परमात्मतत्त्व प्रकट करणाऱ्या या शिवशक्ति दांपत्याला माझा नमस्कार, असें श्रीज्ञानदेव महाराज म्हणतात. ४५.

**जयाच्या रूपनिर्धारीं । गेली परेसी वैखरी ।। सिंधूशी प्रलय-नीरीं । गंगा जैशी ।।४७।। जया दोघांच्या आलिंगनीं । विरोनि गेलीं दोनी ।। अवघीयाचि रजनी । दिठीच जे ।। ४७ ।। वायू चळबळेशी । जिराला व्योमाचिये कुशी ।। अटला प्रळयप्रकाशी । सप्रभभानु ।। ४८ ।। तेवीं निहाळितां ययातें । गेले पाहणेनशी पाहते ।। पुढती घरौतें वरौते ।। वंदिलीं तियें ।। ४९ ।। जयाच्या वाहणीं । वेदकु वेद्याचें पाणी ।। न पिये पण सांडणी । आंगा-चीही करी ।। ५० ।। तेथ मी नमस्कारा–। लागीं हों दुसरा ।। तरी लिंगभेद पऱ्हा । जोडूं जावो ।।५१।। परी सोनेनसी दुजें । नव्हतु लेणें सोना भजे ।। हें नमन करणें माझें । तैसें आहे ।।५२।।**

---

प्रकृतिपुरुषाच्या आलिंगनामध्यें ( अधिष्ठानस्वरूपांत ) दोघेंहि विरून जातात. मग सर्व अज्ञान निवृत्त होतें. केवळ स्वरूपेंकरून ज्ञानच म्हणजे परमात्मा उरतो. ४६. प्रकृतिस्वरूपाचा विचार करूं गेलें असतां, गंगा समुद्रासह जशी प्रलयोदकांत लीन होते, तशी परेसह वैखरी वाणी लयाला जाते. ४७. वायु आकाशांत स्वतःच्या गतीसह नाहींसा होतो, प्रलयकालीं वाढलेल्या तेजांत, प्रभेसह सूर्य नाहींसा होतो, त्याप्रमाणें प्रकृतिपुरुषांच्या यथार्थ स्वरूपाचा विचार करतांना पाहणारा व पाहणें, दोघेंहि नाहींशीं होतात; अशा अंतर्बाह्य व्याप्त प्रकृतिपुरुषांना मीं वंदन केलें. ४८–४९. प्रकृतिपुरुषांच्या यथार्थ स्वरूपाचा विचार करतांना जें जाणून घ्यायचें त्याचें ज्ञान होत नाहींच; उलट जाणणारा मात्र स्वरूपाचा नाश करून घेतो.५०. भेदशून्य प्रकृतिपुरुषांना वंदन करणारा मी त्यांच्याहून निराळा राहिलों तर लिंगभेद करण्याला मला दुसरीकडे जाण्याची आवश्यकता काय? ५१. सुवर्णाहून भिन्न न होता अलंकार सोन्याशीं अनन्य असतो; तसें प्रकृति आणि पुरुषांशीं एकरस होणें हेंच त्यांना माझें वंदन होय. ५२.

सांगता वाचेतें वाचा । ठावो वाच्यवाचकाचा ।। पडतां काय भेदाचा । विटाळु होये।।५३।।सिंधु आणि गंगेची मिळणी । स्त्रीपुरुष नामाची मिरवणी ।। दिसतसे तरी काय पाणी । द्वैत होईल ।।५४।। पाहें पा भास्य भासकथा । आपुलां ठाई दाविता ।। एकपण काय सविता । मोडीतसे ।।५५।। चांदाचिया दोंदावरी । होता चांदणियाची विखुरी ।। काय उणें दीपींवरी । गिंवसो पा दीपु ।। ५६ ।। मोतियाची कीळ । होय मोतियावरी पांगुळ ।। अगळे निर्मळ । रूपा ये कीं ।। ५७ ।। मात्राचिया त्रिपुटिया । प्रणवू काय केला चिरटिया ।। कीं णकार ती रेघटिया । भेदवला काई ।।५८।। अहो ऐक्याचें मुद्दल न ढळे । आणि साजिरपणाचा लाभ मिळे ।। तरी स्वतरंगाचीं मुकुळें । तुरंबु कां पाणी ।। ५९ ।।

---

वाणीनें वाणी असा शब्द उच्चारा. शब्द दोन दिसले तरी, वाणीला भेदाचा स्पर्श होत नाहीं. ५३. गंगा समुद्राला मिळाली, या वाक्यानें स्त्री-पुरुष नामाचा भेद दिसला, तरी पाण्याच्या ठिकाणीं भेदाचा स्पर्श तरी होतो का? नाहीं. ५४. प्रकाश व प्रकाश्य हीं दोन्ही सूर्याच्या ठिकाणीं दिसलीं तरी सूर्याच्या एकत्वाची बाधा होत नाहीं. ५५. चंद्र-बिंबावर चांदण्याचा प्रकाश पडला तरी तो चंद्राहून निराळा आहे का? अथवा आम्हांस फक्त दिवस हवा, प्रकाश नको, तर असें म्हणणाराला प्रकाशाहून दिवा भिन्नपणानें शोधितां येईल काय? नाहीं. ५६. मोत्यावरील तेज जसें त्याच्यावरच राहतें; उलट तें त्याला अधिक शोभा मात्र आणतें. ५७. अकार, उकार व मकार या तीन मात्रांनी प्रणवाच्या चिरफळ्या केल्या असें म्हणावें का अथवा देवनागरी भाषेंत 'ण' असा 'ए' लिहितात त्यामुळें 'ण' अक्षर सिद्ध होतें असें म्हणावयाचें कीं त्याचा भेद होतो असें म्हणावयाचें? ५८. आपल्या एकत्वाला धक्का न लागतां जर शोभेचा लाभ होत असेल तर पाण्यानें आपणांवर उठणारे तरंग हींच पुष्पें, त्यांचा वास का न घ्यावा? ५९.

म्हणोनि भूतेशु भवानी । वंदिलीं न करोनि सिनानीं ॥ मी निघालों नमनीं । तें हें ऐसें ॥ ६० ॥ दर्पणाचेनि त्यागें । प्रतिबिंब बिंबीं रिगे ॥ कां बुडी दीजे तरंगें । वायूचा ठेला ॥ ६१ ॥ नातरी नीदजात खेवो । पावे आपुला ठावो ॥ तैशी बुद्धित्यागें देवीदेवो । वंदिलीं मिया ॥ ६२ ॥ सांडूनि मीठपणाचा लोभु । मिठें सिंधुत्वाचा घेतला लाभु ॥ तेवीं अहं देऊनि मी शंभु । शांभवी जालों ॥६३॥ शिवशक्ति समावेशें । नमन केलें म्यां ऐसें ॥ रंभागर्भ आकाशे । रिघाला जैसा ॥ ६४ ॥

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते शिवशक्ति-**
**समावेशनमनंनाम प्रथमं प्रकरणं संपूर्णम्**

---

पुरुषाहून प्रकृति निराळी न होतां मीं त्यांना वंदन केलें. असा ह्या माझा वंदन करण्याचा सोहळा आहे. ६०. मुखाचें प्रतिबिंब आरशाच्या त्यागानें मूळ बिंबाशीं म्हणजे मुखाशीं ऐक्य पावतें, किंवा वायु वाहण्याचा थांबल्याबरोबर तरंग पाण्यांत बुडी मारतात, पाणीरूप होतात. ६१. झोंप संपताच लगेच आपल्याला आपलेपणाची प्राप्ति होते, त्याचप्रमाणें जीवपणाच्या उपाधीचा त्याग करून मीं प्रकृतिपुरुषांना वंदन केलें. ६२. मिठानें मीठपणाचा लोभ सोडल्यावर तें समुद्राएवढें होतें, त्याचप्रमाणें अहंपणा सोडून मीं प्रकृपुरुषरूप झालों. ६३. केळीचें सोपट काढलें कीं, त्यांतील आकाश म्हणजे वायु आकाशरूप होतो, त्याचप्रमाणें प्रकृतिपुरुषांशीं मीं अभिन्न असून त्याना अशाप्रकारें वंदन केलें. ६४.

याप्रमाणें श्रीमत् अमृतानुभव ग्रंथांतील शिवशक्तिसमावेशनमन नामक पहिलें प्रकरण समाप्त झालें.

**प्रकरण पहिलें समाप्त**

# प्रकरण दुसरें

आतां उपायवनवसंतु । जो आज्ञेचा आहेवतंतु । अमूर्तचि परी मूर्तु ॥ कारुण्याचा ॥ १ ॥ मोडोनी मायाकुंजरु । मुक्तमोतियाचा बोगरु ॥ जेवाविता सद्गुरु । निवृत्ति वंदूं ॥ २ ॥ अविद्येचे आडवे । भुंजीत जीवपणाचे भवे ॥ तया चैतन्याचे धांवे । कारुण्यें जो कीं ॥ ३ ॥ जयाचेनि आपांगपातें । बद्ध मोक्षपणीं आते ॥ भेटे जाणतया जाणतें । जयापाशीं ॥ ४ ॥ कैवल्या कनकाचिया दाना । जो न कडसी थोरसाना ॥ द्रष्ट्याचिया दर्शना । पाढाउ जो ॥ ५ ॥ सामर्थ्याचेंनि बिकें । जो शिवाचेंही गुरुत्व जिंकें ॥ आत्मा आत्ममुख देखे । आरसा जिये ॥ ६ ॥

---

नाना प्रकारचीं साधनें हींच जणूं कांहीं अरण्यें. त्यांत वसंतऋतूसारखी बहरलेली ब्रह्मविद्या. ती जाणून घेण्याची किल्ली म्हणजे श्रीसद्गुरु. हे सद्गुरु शरीर धारण करण्याचा त्यांचा स्वभाव नसतांहि केवळ भक्तांचा उद्धार करण्यासाठीं देह धारण करतात. १. पुनःपुन्हा जन्ममरण घडणें या फेऱ्यांत सांपडलेल्या जीवांकडे पाहण्यासाठीं धांवून येते. २. सद्गुरु हे मायारूप हत्तीचा नाश करून त्याच्या जवळच्या मुक्तीची अवस्था हेंच मोतीं त्याचें पक्वान्न जीवांना आग्रहानें वाढतात. ३. अशा गुरुरायांना माझें वंदन असो. जीवाचे अज्ञान सद्गुरूच्या ज्ञानमय कृपाकटाक्षानें नाहींसें होतें, आत्मस्वरूपाची प्राप्ति होते. शब्दपंडितांना पूर्ण पंडित भेटतो. ४. सद्गुरु मोक्षरूपी सोनें दान देतात. लहान, मोठा असा फरक त्यांच्यांजवळ नसतो. जीवाचें देवपण ते घालवितात, द्वैताचा पराभव करतात. ५. ज्ञानरूपी सामर्थ्यांमुळें त्र्यैगुण्योपाधीन सृष्टि घडविणाऱ्या देवतांचें कर्तृत्व त्यांना सहज आकलन झालेलें असतें. सद्गुरुमूर्ति जीवांचे आत्मरूपदर्शक आरसेच होत. ६.

**बोधचंद्राचिया कळा । विखुरल्या एकवळा ॥ कृपापुनींव लीळा । करी जयाची ॥ ७ ॥ जो भेटलियाचिसवे । पुरति उपायाचे धांवें ॥ प्रवृत्तिगंगा स्थिरावे । सागरीं जिये ॥ ८ ॥ जयाचेनि अनवसरें । द्रष्टा ले दृश्याचें मोहिरें । जो भेटतखेव सरे । बहुरूपाचि हें ॥ ९ ॥ अविद्येचे काळवखें । कीं स्वबोधसुदिनीं फांके ॥ सीतले प्रसादार्कें । जयाचेनि ॥ १० ॥ जयाचेनि कृपासलिलें । जीवू हा ठाववरी पाखाळे ॥ जे शिवपणही वोविळें । अंगीं न लवी ॥ ११ ॥ राखों जातां शिष्यातें । गुरुपणही धाडिलें थितें ॥ तरी गुरुगौरव जयातें । सांडीचिना ॥ १२ ॥ एकपण नव्हे सुसास । म्हणूनि गुरुशिष्याचें करूनि मिस ॥ पाहणेंचि आपली वास । पाहताचि असे ॥ १३ ॥ जयाचेनि कृपातुषारें । परतलें अविद्येचें मोहिरें ॥ परिणमे आपारें । बोधामृतें ॥ १४ ॥**

---

बोधरूपी चंद्राला अनेक कला पसरल्या असल्या तरी त्या गुरुपादुका-रूपीं पौर्णिमेला एकत्र होतात. ७. आपण अनेक साधनांसाठी केलेली धांवाधांव सद्‌गुरुदर्शनानें संपते. प्रवृत्तिरूपी आपली गंगा सद्‌गुरुरूपी समुद्राला मिळते. ८. गुरुमूर्तीचें दर्शन झालें नाहीं, तोपर्यंतच जगाच्या व्यवहाराची महति. सद्‌गुरुदर्शनानें जगाचें मिथ्यापण कळतें. ९. सद्‌गुरु-बोधरूपी प्रकाश फांकताच अज्ञानरूपी निशा संपते. आत्मसंतुष्ट करणारा गुरुप्रसाद सर्वत्र पसरतो. १०. गुरुकृपारूपी शुद्धोदकानें हा जीवात्मा इतका पवित्र होतो कीं, ब्रह्मत्व जरी त्याच्याकडे गेलें, तरी आपल्या अंगाला तें तो चिकटूं देत नाहीं. ११. शिष्यास ज्ञानी करावयाचें झाल्यानें ते आपला मोठेपणा सोडतात. यांत त्यांचें अद्वितीयत्व कमी होत नाहीं. १२. दुःखाशिवाय सुखाची किंमत समजत नाहीं; त्याच-प्रमाणें सद्‌गुरु आपल्या शिष्याला सांगण्याच्या मिषानें आपले आपणालाच पाहतात. १३. गुरुकृपेच्या जलकणांनीं अज्ञानाचे हल्ले परतवले जातात. अपार बोधामृत लाभतें. १४.

वेद्या देतां मिठी । वेदकूही सुये पोटीं ॥ तऱ्ही नव्हेचि उशिटी । दिठी जयाची ॥१५॥ जयाचेनि सावायें । जीवू ब्रह्मउपर लाहे ॥ ब्रह्म तृणातळीं जाये । उदासें जेणें ॥ १६ ॥ उपास्तीवरी राबतिया । उपायफळीं येती मोडूनियां ॥ वरिवंडिलें जयाचिया । अनुज्ञा का ॥ १७॥ जयाचा दिठिवा वसंतु । जंव न रिघे निगमवनाआंतु ॥ तंव आपुलिये फळीं हातु । न वेपती ही ॥१८॥ पुढें दृष्टीचेनि अलगें । खोची की निवटे मागें ॥ येवढेया जैता नेघे । आपणपें जो ॥ १९ ॥ लघुत्वाचेनि मुदलें । बैसला गुरुत्वाचे सेले ॥ नासूनि नाथिलें । सदैव जो ॥२०॥ नाहीं तें जळीं बुडिजे । तें घनवटें जेणें तरिजे ॥ जेणें तरिलियाहि नुरिजे । कवणीं ठायीं ॥ २१ ॥

---

अशा त्या परमेश्वरस्वरूपी श्रीगुरूला मिठी देतांच, हा शिष्य त्यांशीं लीन होतो. सद्‌गुरूची कृपादृष्टि मलिन होत नाहींच. १५. सद्‌गुरूच्या आश्रयानेंच 'शिष्य अहं ब्रह्मास्मि' च्या पलीकडे जातो. गुरूंच्या उदासीनतेमुळें अज्ञानांतून तृणापेक्षांहि हलक्या अवदशेला जातो. १६. उपासनेसाठी राबल्यावर, त्या साधनेचीं फळें सद्‌गुरूच्या आज्ञेनें परिपूर्ण होतात. १७. वेदांतशास्त्र हेंच एक वन. त्यांत सद्‌गुरूची कृपादृष्टि हाच कोणी वसंत ऋतु जोंपर्यंत अस्तित्वाला येत नाहीं, तोपर्यंत हीं मोक्षरूपी फळें हातीं येणें शक्य नसतें. १८. सद्‌गुरूंनीं ज्ञानाचें अंजन आपल्या डोळ्यांत घातलें कीं, सारें सारें अज्ञान तें नाहींसें करतें. आपण अशी फार मोठी कर्तबगारी गाजवीत आहोंत, अशी सद्‌गुरूंच्या ठिकाणीं जाणीवहि नसतें. १९. श्रीगुरूंचा मोठेपणा शिष्यरूपीं भांडवलावर आहे. तें भांडवल म्हणजे शिष्यपणा सद्‌गुरूच घालवितात. २० आपल्याशीं शिष्याला समरस करून घेतात. कल्पनेनें निर्मिलेल्या मायारूपी पाण्यांत त्यांना कृपाघन श्रीगुरूची कृपाच तारते. त्यानंतर त्याचें अस्तित्वहि शिल्लक राहात नाहीं. २१.

**आकाश हें सावेव । न बंधे आकाशाची हाव ।। ऐसें कोणी-एक भरीव । आकाश जो ।। २२ ।। चंद्रादि सुशीतळें । घडली जयाचेनि मेळें । सूर्य जयाचेनि उजाळे कडवसेनी ।। २३ ।। जीवपणाचेनि त्रासें । यावया आपुलिये दशे । शिवही मुहूर्त पुसे । जया जोशियातें ।। २४ ।। चांदिणें स्वप्रकाशाचें । लेइला द्वैत-दुणीचें ।। तऱ्ही उघडेपण नवचे । चांदाचें जया ।। २५ ।। जो उघड कीं न दिसे । प्रकाश कीं न प्रकाशे ।। असतेपणेंचि नसे । कव्हणीकडे ।। २६ ।। आतां जो तो इहीं शब्दीं । के मिळवूं अनु-मानाची मांदी ।। हा प्रमाणाही वो नेदी । कोणाही मा ।।२७।।**

आपल्या दृष्टीला दिसणारें हें पंचमहाभूतांनीं युक्त असें जड आकाश आहे. सद्गुरूच्या ज्ञानरूप चिदाकाशाची बरोबरी त्या जड आकाशाकडून होणें कठीण आहे. परमात्मा सद्गुरु हा ज्ञानरूप चिदाकारच होय. २२. चंद्र वगैरे सर्व शांत वस्तुजात याच्यामुळें आकाराला आलें. याच्याच कव-डशानें सूर्याला प्रकाश मिळाला. २३. अनंत ब्रह्मांडाची घडामोड करणारा शिव देखील या उपाधीमुळें त्रासून जावा आणि मूळ स्वरूपाला केव्हां मिळेल, असा त्यानें प्रश्न करावा यांत नवल नाहीं. मग आपण तर मर्त्य पामर, आपण कोठें बसूं ? २४. चांदण्यांचा प्रकाश चंद्रानें पांघरला म्हणजे दोन्ही वेगळीं वाटतात. पण प्रकाश चंद्रापासून मिळत असल्यानें तो चंद्र एकच्या एकच उघड ठरतो. २५. त्याचप्रमाणें तो परमात्मा उघड असूनहि दिसत नाहीं, स्वयंप्रकाशित असूनहि भासत नाहीं. आणि सर्व-व्यापक असून जाणवत नाहीं. २६. अनेक शब्दांच्या रूपानें मिळवूं म्हटले तरी, तो कोणत्याहि रीतीनें त्यांच्या तडाख्यांत सांपडतच नाहीं. २७.

जेथें शब्दाची लिही पुसे । तेणेंशीं चावळों बैसे ॥ दुजयाच्या रागीं रुसे । एकपणा जो ॥ २८ ॥ प्रमाणाची परी सरे । तैं प्रमेयेचि अविष्करे ॥ नवल मेचु ये धुरे । नाहींपणाची ॥२९॥ कांहींबाही अळुमाळु । देखे येखादे वेळू ॥ तरी देखे तेंही विटाळू । जया गांवीं ॥ ३० ॥ तेथें नमने कां बोलें । केउती सुये पाउले ॥ आंगीं लावूनि नाडिले । नांवचि येणें ॥ ३१ ॥ नव्हे आत्मया आत्मप्रवृत्ति । वाढवितां के निवृत्ति ॥ या नामाची वाय बुंथी । सांडीचिना ॥ ३२ ॥ निवर्त्यें तंव नाहीं । मा निवर्तवी हा काई ॥ तरी कैशी बैसे ठाईं । निवृत्तिनामाच्या ॥३३॥ परी सूर्यासी अंधकारु । कै जाहला होता गोचरु ॥ तरी तमारी हा डगरु । आलाचि कीं ॥३४॥ तैसें लटिकें येणें रूढ । जड येणें उजिवडें ॥ न घडे तेंही घडे । याचिया मावा ॥३५॥

---

शाब्दिक वर्णनें जेथें कुचकामी तेथें तीं करून तरी काय उपयोग ? वर्णन करणारा दुसरा असा द्वैतभाव त्यांना खपत नाहीं. ते एकरूप असतात. २८. सर्व प्रकारचीं उदाहरणे बरोबर ठरत नाहींत, तेव्हांच मूळ स्वरूप प्रकट होतें. तें निराकारी असूनहि साकार होतें, हें नवल होय. २९. ' थोडेसें पाहूं या ' असें म्हटलें तरी त्याचा तेथें स्पर्श चालत नाहीं. ३०. माझ्या या नयनरूपी बोलांचा तेथें कसा प्रवेश होईल ? अनंत रूपांनीं नटलेल्या परमात्म्यानें सर्व नामें व्यर्थ केलीं. या दृष्टीनें निवृत्ति हें नांव सार्थच आहे. ३१. जर सद्‌गुरूच्या ठिकाणीं आत्मप्रवृत्ति नाहीं, मग ' निवृत्ति ' हें नांव तरी कोठें टिकतें ? ३२. ते निवारण करणार म्हणजे तरी काय करणार ? कारण निवारण करण्यासारखें कांहीं नाहींच. मग निवृत्ति यांत असा काय मोठेपणा आहे ? ३३. सूर्यानें अंधार पाहिला आहे तरी कधीं ? ' अंधाराचा शत्रु ' असेंच सूर्याला म्हणतात ना ? ३४. आणि सत्तेनें खोट्याला खरेंपणा मिळतो. अचेतन, मिथ्या जगाला चेतना मिळते आणि याच्या मायेनें न घडणारेंहि घडतें. ३५.

**ह्यांगा मायावशें दाविशी । तें माइक म्हणूनी वाळिशी ॥ अमाइक तव नव्हशी । कवणाही विषयो ॥ ३६ ॥ शिव शिवा सद्गुरु । तुजला गूढा काय करूं ॥ एकाही निर्धार धरूं देतासी कां ॥ ३७ ॥ नामें रूपें बहुवसें । उभारूनि पाडिलीं वोसें ॥ सत्तेचेनि आवेशें । तोषलासी ना ॥ ३८ ॥ जीवू घेतलिया उणें । चालों नेदिसी साजणें ॥ मृत्यु उरे स्वामीपणें । तेंही नव्हे ॥ ३९ ॥ विशेषाचेनि नांवें । आत्मत्वही न साहवे ॥ किंबहुना नव्हे । कोण्हीच यया ॥ ४० ॥ राती नुरेचि सूर्या । नातरी लवण पाणिया ॥ नुरे जेवि चेइलिया । नीद जैशी ॥ ४१ ॥**

---

हे सद्गुरो ! आपण मायेच्या प्रकाशरूपीं ज्वालेनें जगाचें दर्शन घडवितां तें न टिकणारें आहे. निषिद्ध आहे असें सांगतां आणि आपण स्वतः तर मायेच्या पैलतीराला असलेलें आहांत ना ? ३६. छे छे, हे गुरुमाउली, हें तुझें सारेंच गूढ आहे. ते उकलून समजून घ्यायचें ठरवूं म्हटलें तरी तूं होऊं देत नाहींस. ३७. केवढा तुझा व्याप ! किती तुझीं नांवें, अगणित तुझीं रूपें ! पण तूं सारींच पार जमीनदोस्त करतोस. पण या सत्तेचा तुम्हांला संतोष वाटतो थोडाच ? ३८. छे, तिचा तुम्हांला गर्वहि नाहीं. शिष्यावर कृपा करण्याआधीं हे गुरो, तुम्ही त्याच्या अहंपणाचा, जीवाभावनेचा बळी घेतां, त्याला त्याशिवाय सामर्थ्यवान् करीत नाहीं. आपल्याशीं समरस झाल्यावर तरी तो गुरुरूपानें शिल्लक राहतो म्हणावें तर तसें मुळींच नाहीं. ३९. त्यांतहि विशेष म्हणजे जिवाला ‘ आत्मत्व ’ हि सहन होत नाहीं. एवढेंच नव्हे, कांहींच व्हावयाचें नसतें. ४०.सूर्योदयानंतर रात्र नसते. पाण्यांत पडल्यावर मीठ शिल्लक राहात नाहीं आणि जागे झाल्यावर झोंप नाहीं. ४१.

**कापुराचे थळीव । नुरेचि आगीची वरव । नुरेचि रूप नांव । तैसें यया ॥ ४२ ॥ याच्या हातां पायां पडे । तंव वंद्यत्वें पुढें न मंडे ॥ न पडेचि हा भिडे । भेदाचिये ॥ ४३ ॥ आपणाप्रति रवि । उदो न करी जेवि ॥ हा वंद्य नव्हे तेवी । वंदनासी ॥ ४४ ॥ कां समोरपण आपुलें । न लाहिजे कांहीं केलें ॥ तैसें वंद्यत्व घातलें । हिरोनी येणें ॥ ४५ ॥ आकाशाचा आरिसा । नुठी प्रतिबिंबाचा ठसा ॥ हा वंद्य नव्हे तैसा । नमस्कारासी ॥ ४६ ॥ परी नव्हे तरी न हो । हे वेखासि कां घेवों ॥ परी वंदितयाही ठावो । उरों नेदी ॥ ४७ ॥ आंगौनि एकुणा झोलु । फेडितांचि तरि तो बाहिरीलु ॥ कडु फिटे आतुलु । न फेडितांचि ॥ ४८ ॥**

---

कापुराचे उत्तमोत्तम अलंकार अग्नीच्या सहवासांत आपलें नांव, रूप जसें सोडतात, त्याप्रमाणें शिष्याचा गुरूपुढें भेद मावळतो. ४२. श्रीसद्गुरूची कितीही विनवणी केली तरी द्वैताचा पसारा मांडीत नाहींत. भेदाच्या या भिडेला ते लाथाडून देतात. ४३. सूर्य हा स्वतःसाठीं उगवत नाहीं, त्याप्रमाणें सद्गुरुमूर्ति स्वतःस वंद्य नाहीं. ४४. आपण आपणांस समोर पाहूं शकत नाहीं; त्याप्रमाणें श्रीगुरूंनीं वंदन स्वतःपुरतें नष्ट केलें आहे. ४५. आभाळांत प्रतिबिंब पडत नाहीं ना ? तसेंच वेगळेपणा नसल्यामुळें, सर्वत्र सद्गुरूच भरल्यामुळें त्यांनीं नमस्कार दुसऱ्या कुणाचा घ्यायचा तरी कसा ? म्हणूनच सद्गुरु हें वंद्यत्वाचे द्योतकहि नाहींत. आणि नमस्कार करणारेहि नाहींत. ४६. बरे, नसतील सद्गुरु वंद्य तर नसेनात का, मी कशाला त्यांना हीन लेखूं ? पण हा सद्गुरुराय नमस्कार करणाराची सुद्धां नांवनिशी शिल्लक ठेवीत नाहीं. ४७. धोतराचें एक टोक जोरांत ओढलें कीं, सर्व धोतर निसटायला वेळ लागत नाहीं. ४८.

**नाना बिंबपणासरिसे । घेऊनि प्रतिबिंब नासे ।। नेलें बंधत्व येणें तैसें । वंद्तेनसी ।। ४९ ।। नाहीं रूपाची जेथें सोये । तेथें दृष्टिचें कांहींच नव्हे ।। आम्हां फळले हे पाये । ऐशिया दशा ।। ५० ।। गुणातेलाचिया सोइरिका । निर्वाहिली दीपकळिका ।। ते कां होईल पुळिका । कापुराचिया ।। ५१ ।। तया दोहीं परस्परें । होय ना जंव मेल्हेरे ।। तंव दोहींचेंही सरे । सरिसेंचि ।।५२।। तेवि देखेना मी ययातें । तंव गेले बंद्य वंदिते ।। चेइलिया कांते । स्वप्नींचि जेवि ।। ५३ ।। किंबहुना इया भाषा । द्वैताचा जेथें उपखा ।। फेडूनियां स्वसखा । श्रीगुरु वंदिला ।। ५४ ।। याच्या सख्याची नवाई । आंगीं एकपणा रूप नाहीं ।। आणि गुरुशिष्य दुवाळीही । पवाडु केला ।। ५५ ।।**

---

बिंबासकट प्रतिबिंब नाहींसें होतें तसें वंदन करणाऱ्याच्या सह सद्गुरु वंद्य नाहींसे करतात. म्हणजे दुजाभाव घालवितात. ४९. हें सारें रूप आणि आकार ज्ञानाच्या पलीकडचें आहे तेथें त्या ज्ञानाचा कांहीं उपयोग नाहीं हें समजायला मात्र सद्गुरूच्या चरणांचा आश्रय घ्यावा लागतो.हा लाभ आम्हांस झाला आहे. ५०. कापूर ह्या वस्तूची ज्योति वेगळ्या प्रकारची असते. तेल आणि त्यांत ठेवायची वात यांच्या सहवासानें उपजलेली ज्योत ही पण आणखी वेगळ्या प्रकारची असते. ५१. कापुराला अग्नि लावल्याबरोबर कापूर जळतो, अग्नि नष्ट होतो. ते दोघेहि एकदमच नाश पावतात. ५२. जागे झालेल्याला स्वप्नांतलें दांपत्यसुख कुचकामी. श्रीगुरूंना पाहिल्याबरोबर वंदकत्व आणि वंद्यत्व नाहींसें झालें. ५३. द्वैताचे हें शाब्दिक वर्णनहि निरर्थक म्हणून स्वात्मसखा श्रीगुरूंना मीं नमस्कार केला. ५४. हें या स्वात्मसखा श्रीगुरूचें आश्चर्य आहे कीं याला एकटेपणा नाही, रूप नाहीं आणि तरीसुद्धां गुरुशिष्याच्या द्वैतरूपानें जगभर ज्ञान फैलावलें आहे. ५५.

**कैसा आपणा आपण। दोंवीण सोयरेपण ॥ या याहूनि विलक्षण। नाहीं ना नोहे ॥ ५६ ॥ जग अवघें पोटीं माये। गगनायेवढें होऊनि ठाये ॥ कीं तेचि निसी साहे। नाहींपणाची ॥ ५७ ॥ कां पूर्णते तरी आधारू। सिंधू जैसा दुर्भरू ॥ तैसा विरुद्धा पाहुणेरू। याच्या घरीं ॥ ५८ ॥ तेजा तमातें कांहीं। परस्परें निकें नाहीं ॥ परी सूर्याच्या ठाईं। सूर्यचि असे ॥ ५९ ॥ एक म्हणता भेदें। ते कीं नानात्वें नांदे ॥ विरुद्धे आपणया विरुद्धे। होतील काई ॥ ६० ॥ म्हणोनि शिष्य आणि गुरुनाथु। या दोही शब्दांचा अर्थु ॥ श्रीगुरुचि परी होतु। दोहीं ठाईं ॥ ६१ ॥ कां सुवर्ण आणि लेणें ॥ वसतें एके सुवर्णे। बसतें चंद्र चांदिणें। चंद्रींचि जेवी ॥ ६२ ॥**

---

उत्पत्ति ही दांपत्याशिवाय होत नसते, यानें आपणालाच आपला जोडीदार केला आहे. जन्ममरणातीतत्व असें याचें सारेंच विलक्षण आहे. ५६. हें अगडबंब जग याच्या पोटांत सामावलें आहे. उजेडामुळें दिवसा खूप विस्तृत दिसणारें हें जग काळोखांत रात्रीं जेव्हां बुडतें तेव्हां तें तेथें नाहींच असें वाटतें. ५७. समुद्र हाच एक भरती आणि ओहोटी यांना आधार असतो. या एकमेकाविरुद्ध असणाऱ्या द्वैत आणि अद्वैत या पाहुण्यांचा निवास यांच्या घरीं असतो. ५८. अंधार आणि उजेड यांची मैत्री किती ? अगदीं शून्य, मुळींच नाहीं. बरें, ज्यापासून ते दोघे होतात तो सूर्य तर एकाला एकच आहे. ५९. त्यावरहि सूर्य एकच म्हणूं तर तो अनेक रूपांनीं वावरतो आहे. पण हा परस्पर विरोध गुरूंच्या ठायीं नसतो. ६०. म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात कीं, गुरु आणि शिष्य या दोन शब्दांचा अर्थ मात्र एकच आहे. तो आहे सद्गुरु. ६१. दागिन्यांतलें सोनेंच हें सर्व दागिन्याभर असतें. तें एकच असतें. चंद्र आणि त्याचें चांदणें वेगळें नसतें. तें चांदणें चंद्रमय असतें. ६२.

**नाना कापूर आणि परिमळु । कापूरचि केवळु ॥ गोडी आणि गुळु । गूळचि जेवि ॥ ६३ ॥ तैसा गुरुशिष्यमिसें । हाचि एकु उल्हासे ॥ जरी कांहीं दिसे । दोनीपणें ॥ ६४ ॥ आरसा आणि मुखीं । मी दिसे हे उखी । हे आपुलिये ओळखी । जाणे मुख ॥६५॥ पहा पा निरंजनीं निदेला । तो निर्विवाद एकला ॥ परी चेता चेवविता जाला । दोनी तोचि ॥६६॥ जे तोचि चेता तोचि चेववी । तेवीं हाचि बुझे हा बुझावी ॥ गुरु शिष्यत्व नांदवी । ऐसेन हा ॥ ६७ ॥ दर्पणेंवीण डोळा । आपुले भेटीचा सोहळा ॥ भोगिता तरी लीळा । सांगतों हे ॥ ६८ ॥ एवं द्वैतासी उमसो । नेदी ऐक्याशी विसकुसो ॥ सोइरिकीचा अतिसो । पोखीतसे ॥ ६९ ॥ निवृत्ति जया नांव । निवृत्ति जया बरव ॥ जया निवृत्तीची राणीव । निवृत्तीची ॥ ७० ॥**

---

कापूर आणि त्याचा सुवास हें अभिन्न एकच. गूळ आणि गोडी हीं अभिन्न. ६३. परमात्मारूप सद्गुरु जरी रूपातीत असला, तरी तो सत्शिष्याच्या प्रतीकानें जगत्विलास करतो. ६४. आपणास आरशाचें प्रतिबिंब हें आपल्याच मुखाचें आहे हें कळतें व तें क्षणैक असतें हें आपण जाणतों. ६५. एखाद्या घोर निर्जन अरण्यांत कोणी झोंपला तर तो एकटा असेना ? पण नंतर तो जागा होणारा आणि जागे करणारा असा त्याचा तोच दोन्ही असतो. ६६. जागा होणाराच जागे करणारा असतो, त्याप्रमाणें हा सद्गुरु स्वतः सांगतो व स्वतःलाच समजावून घेतो. अशा प्रकारे गुरुशिष्याचे संबंध चालवीत असतो. ६७. आरशाशिवाय नेत्र जर प्रतिबिंबदर्शनाचा आनंद मिळवूं शकेल, त्याप्रमाणें हें आहे. ६८ तो द्वैताला फिरकूं देत नाहीं. अद्वैतपणा विस्कटूं देत नाहीं. पण परस्पर संबंध तर उत्तम तऱ्हेनें पोषीत असतो. ६९. निवृत्तिनाथ ज्याचें नांव, निवृत्ति ज्याची शोभा, निवृत्तीचें राज्यपद जो भोगतो; तेच हे खरेखुरे निवृत्तिनाथ. ७०.

**वांचोनि प्रवृत्तिविरोधें । कां निवृत्तीचेनि बोधें ॥ आणिजे तैसा वादे । निवृत्ति नव्हे ॥ ७१ ॥ आपणा देऊनि राती । दिवसा आणि उन्नति ॥ प्रवृत्ति वारी निवृत्ती । नव्हे तैसा ॥७२॥ ओपसरयाचें बळ । घेऊनि मिरवे कीळ ॥ तैसें रत्न नव्हे निखिळ । चक्रवर्ती हा ॥ ७३ ॥ गगनही सूनी पोटीं । जें चंद्राची पघळे पुष्टी ॥ तें चांदिणें तेणेंसी उठी । आंग जयाचें ॥ ७४ ॥ तैसें निवृत्तिपणासी कारण । हाचि आपणया आपण ॥ घेयावया फूलचि झालें घ्राण । आपुली द्दति ॥ ७५ ॥ दिठी मुखाचिये बरवे । पाठीकडूनि जैं पावे ॥ तैं आरसे धांडोळावे । लागती काई ॥ ७६ ॥ कीं राती हन गेलिया । दिवस हन पातलिया ॥ काय सूर्यपण सूर्या । होआवें लागे ॥ ७७ ॥**

---

प्रवृत्तिमार्गाचा विरोध करून, उपदेशाप्रमाणें निवृत्तिमार्ग चोखाळून आणि वादविवाद–चर्चा करून; सर्वसामान्यजन व परोक्षज्ञानी निवृत्तिमार्गी होतात; तसें हे नव्हेत. ७१. सूर्य मावळल्यावर रात्र देतो आणि पुन्हां दिवस निर्माण करून आपलें हित पाहतो; तसे हे नव्हेत. ७२. रत्नाचें तेज अधिक दिसावें म्हणून जसें त्याच्या कोंदणांत एक प्रकारचें पूट देतात आणि मग तेजःपुंज म्हणून तें मिरवतें; तसे निवृत्तिनाथ नाहींत. स्वयंभु रत्नराज होत. ७३. चंद्राचा धवल प्रकाश आकाशाला सामावून सर्वत्र पसरतो त्यावेळीं तो चंद्र आपल्या अंगच्या चांदण्यानें उठून दिसतो. ७४. मूलभूत निवृत्तिपणाला हे स्वतःच कारण आहेत. आपला वास घ्यावयाला फुलानेंच स्वतः नाक व्हावें तसें. ७५. मुखाच्या पुढील भागांतून दृष्टि वावरते, त्याऐवजी ती पाठीमागून वावरली असती तर आरसे हुडकावे लागले असते काय ? ७६. रात्र संपून दिवस निघाल्यावर का सूर्याला सूर्यपणा आणावयाचा असतो ? ७७.

**म्हणोनि बोध्य बोधोनी । घेपे प्रमाणें साधूनि ॥ ऐसा नव्हे भरवसेनी । गोसावी हा ॥ ७८ ॥ ऐसें करणयावीण । स्वयंभचि जें निवृत्तिपण ॥ तयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥ ७९ ॥ आतां ज्ञानदेवो म्हणें । श्रीगुरुप्रणामे येणें ॥ फेडिलीं वाचाॠणें । चौंही वाचांचीं ॥ ८० ॥**

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते श्रीगुरुस्तवन-कथनंनाम द्वितीयप्रकरणं संपूर्णम्**

---

उपदेशानें हा समजावून घेतां यावा किंवा प्रत्यक्ष प्रमाणांनीं प्राप्त व्हावा अशा प्रकारचा विश्वास येथें धरतां येत नाहीं. तो इंद्रियांना अगोचर आहे. ७८. अकृत्रिम स्वयंसिद्ध असें याचें निवृत्तिस्वरूप आहे. त्यांच्या चरणांना मीं वंदन केलें. ७९. श्रीज्ञानेश्वर म्हणतात कीं, श्रीगुरूंना वंदन केलें आणि चहूं वाचांचीं ऋणें फेडिलीं. ८०.

याप्रमाणें श्रीसिद्धानुवादरूपीं श्रीमत् अमृतानुभव ग्रंथांतील श्रीगुरुस्तवन नांवाचें दुसरें प्रकरण समाप्त झालें. ॥

**प्रकरण दुसरें समाप्त**

—x—

# प्रकरण तिसरें

**ययाचेनि बोभाटें । आत्मयाची झोंप लोटे ॥ पूर्ण तऱ्ही ऋण न फिटे । जे चेणेंचि नीद कीं ॥ १ ॥ देऱ्हवीं परादिका चौघी । जीव मोक्षाच्या उपेगी । अविद्येसवें आंगीं । वेंचती कीर ॥ २ ॥ देहासवें हात पाये । जाती मनासवें इंद्रियें ॥ कां सूर्यासवें जाये । किरणजाळ ॥ ३ ॥ नातरी निद्रेचिये अवधी । स्वप्नें मरती आधीं ॥ तेविं अविद्येचे संबंधीं । अटती इया ॥ ४ ॥ मृतें लोहें होती । तें रसरूपें जिती ॥ जळोनि इंधनें येती । वन्हीदशे ॥ ५ ॥ लवण आंगें विरे । परी स्वादें जळीं उरे । नीद मरोनि जागरें । जीइये निदे ॥ ६ ॥ तेवि अविद्येसवें । चौघी वेचिती जीवें ॥ तत्त्वज्ञानाचेनि नांवें । उडतीच इया ॥ ७ ॥**

---

परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार प्रकारच्या वाणीनें आत्म्याची झोंप म्हणजे अज्ञान निवृत्त झालें तरी तें संपूर्ण फिटत नाहीं. कारण तो जागेपणा झोंपेसारखा असतो. १. अविद्येच्या बंधनापासून परादि चार वाणी मोक्ष प्राप्त करून देण्यास उपयोगी आहेत. पण अविद्येबरोबर आपल्या स्वरूपाचा त्या नाश करून घेतील तरच त्या मोक्षोपयोगी आहेत. २. देहाचा नाश झाल्याबरोबर हातपाय जातात. मनाचा लय झाला कीं इंद्रियांचाही होतो. सूर्याबरोबर जशी किरणें जातात. ३. किंवा झोंप संपतांच स्वप्नाचा नाश होतो, त्याप्रमाणें अविद्येच्या नाशानें परादि चारही वाणींचा नाश होतो. ४. जळूनहि लोह भस्मरूपानें जिवंत असतें. लांकूड जळून गेलें तरी निखारा शिल्लक असतो. ५. स्थूलरूपानें पाण्यांत विरघळलेलें मीठ स्वादरूपानें असतेंच; झोंप संपली तरी जागृतिरूपानें ती झोंप जिवंत राहते. ६. चारी वाणी स्थूलरूपानें अविद्येबरोबर नाहींशा झाल्या तरी तत्त्वज्ञानाच्या रूपानें उत्पन्न होतात. ७.

**हा तत्त्वज्ञानदिवा । मरोनी इहीं लावावा ॥ तरी हाही शीण-लेवा । बोधरूपेंचि ॥ ८ ॥ येऊनि स्वप्न मेळवी । गेलिया आपणपा दावी ॥ दोन्ही दिठी नांदवी । नदी जैशी ॥ ९ ॥ जिति अविद्या ऐशी । अन्यथा बोधातें गिवशी ॥ तेचि यथाबोधेंशी । निमाली उठी ॥ १० ॥ परी जिती ना मेली । अविद्या हे जाकळी ॥ बंधमोक्षी घाली । बांधोनियां ॥ ११ ॥ मोक्षचि बंधु होये । तरी मोक्ष शब्द कां साहे । अज्ञाना घरीं त्राये । वाउगी यांची ॥ १२ ॥ बागुलाचेनि मरणें । तोषावें कीं बालपणें ॥ येरा तो नाहीं मा कोणें । मृत्यु मानावा ॥ १३ ॥ घटाचें नाहींपण । फुटलेयाची नागवण ॥ मानितसे ते जाण । म्हणो ये कीं ॥ १४ ॥**

---

या चार वाणींनीं स्वतः मरून तत्त्वज्ञानाचा दिवा लावावा हे ठीक, पण शुद्ध बोधाच्या दृष्टीनें हीहि कटकटच आहे. स्वप्नप्राप्ति, झोंप आल्यावर होते व ती गेली कीं, पुरुषाला स्वस्वरूप म्हणजे जागृति आणते. एक झोंपच स्वप्न व जागृति या दोन्ही दशा दाखविते. ९. 'मी मनुष्य आहें' इ. अन्यथाबोधाची प्राप्ति जिवंत अविद्या करून देते आणि तिचा स्थूल-रूपानें नाश झाला कीं, 'मी ब्रह्मरूप आहें' असा यथार्थ बोध होतो. १०. जिवंत अगर मेलेली अविद्या बंधन करितेच. मेलेली अविद्या जीवाला मोक्षांत अडकवून टाकते. जीवाला बंधांत जखडून टाकते. ११. मोक्ष म्हणजेहि बंधनच असेल तर त्या मोक्षाला तरी कांहीं अर्थ आहे का? अरे, ह्याचा बडेजाव काय तो अज्ञान्याच्या घरीं. म्हणजे असेल. १२. बागुलबुवाच्या मृत्यूनें बालकास आनंद व्हावा हें ठीक, इतरांना तो बागुलबुवा नसतोच, मग त्याचा मृत्यु कोणीं मानावा? १३. नसलेला घट फुटल्यावर 'फार नुकसान झालें' असें म्हणणाऱ्या अज्ञानी लोकांना बंधमोक्ष खरे आहेत, असें खुशाल म्हणूं द्या. १४.

**म्हणोनि बंधचि तंव वावो । मा मोक्षा के प्रसवो ।। परी मरोनी केला ठावो । अविद्या तया ।।१५।। आणि ज्ञान बंधु ऐसें । शिव सूत्राचेनि मिसें ।। म्हणितलें असे । सदाशिवें ।। १६ ।। आणि वैकुंठीचेनिही सुजाणें । ज्ञानपाशीं सत्त्वगुणें ।। बांधिजे हे निरोपण बहु केलें ।। १७ ।। परी शिवें कां श्रीवल्लभें । बोलिलें येणेंचि लोभें । मानूं ते हें लाभे । न बोलतांही ।। १८ ।। जें आत्मज्ञान निखिळ । तेंही घे ज्ञानाचें बळ ।। तैं सूर्य चिंती सबळ । तैसें नोहें ।। १९ ।। ज्ञानें श्लाघतु आहे । तैं ज्ञानपण धाडिलें वाये । दीप वांचोनि दिवा लाहे । तैं आंग भुललाचि कीं ।। २० ।। आपणपें आपणापाशीं । नेणतां देशोदेशीं ।। आपणपें गिंवसी । हें कीरु होये ।। २१ ।।**

---

बंधच जर मिथ्या, तर मोक्ष तरी खरा कशावरून. अविद्येनें स्वतः मरून मोक्षाला जागा करून दिली. १५. आणि शिवसूत्रामध्यें शंकरांनींही 'ज्ञान बंधच आहे' असें स्पष्ट म्हटलें आहे. १६. 'जीव सत्त्वगुणानें ज्ञानपाशांत बद्ध होतो' असें भगवान विष्णूंनींही सविस्तर सांगितलें आहे. १७. हें आम्ही प्रमाण मानतों याचें कारण तीं शंकरांनीं किंवा विष्णूंनीं सांगितलीं असेंच नाहीं तर आमचा स्वतःचा अनुभव तसाच आहे ना! १८. वृत्तिज्ञानाचा आधार जर शुद्ध आत्मस्वरूप ज्ञान घेईल, तर सूर्यानें उगविण्यासाठीं कोणाची मदत घ्यावी, अशी काळजी करण्यासारखें नाहीं का? १९. शब्दज्ञानाला वृत्तिज्ञानानें जर मोठेपण येईल, तर तें मूलभूत ज्ञान व्यर्थच होईल. दिवा जर एखादा पदार्थ पाहण्याकरितां दुसऱ्या दिव्याची अपेक्षा करील; तर तो स्वरूपाला विसरला म्हणावें? २०. आपण आपल्याजवळ नित्य असतांना भ्रमानें 'मी हरवलों' असा निश्चय करून देशोदेशीं आपला शोध करावा. २१.

**परी बहुतां कां दिया । आपणापें आठवलिया ॥ म्हणे मी ययां । कैसा रिझों ॥ २२ ॥ तैसा ज्ञानरूप आत्मा । ज्ञानेंचि आपुली प्रभा । करितसे सोहमा । ऐसा बंधु ॥ २३ ॥ जें ज्ञान स्वयें बुडे । म्हणोनी भारी नावडे ॥ ज्ञानें मोक्षु घडे । तें निमालेनि ॥ २४ ॥ म्हणोनी परादिका वाचा । तो शृंगारु चौ आंगाचा ॥ एवं अविद्याजीवाचा । जीवत्वत्यागीं ॥ २५ ॥ आंगाचेनि इंधनें उदासु । उठोनि ज्ञानाग्नीं प्रवेशु । करी तेथें भस्मलेशु । बोधाचा उरे ॥ २६ ॥ आंगीं लाविलिया विभूति । ते परिमाणूही झडती ॥ परी पांडुरत्वें कांति । राहे जैशी ॥ २७ ॥ जळीं जळा वेगळु । कापूर न दिसे अवडळु ॥ परी होऊनि परिमळु । उरे जेवि ॥ २८ ॥**

असा भ्रम कोणाला कदाचित् झाला, आणि कांहीं दिवसांनीं आपलेपण त्याला आठवलें की तो म्हणेल कीं, 'मी हरवलों होतों पण आतां सांपडलों.' त्याच्या या म्हणण्यानें त्याला आनंद कसा होईल ? कदाचित् मानूं लागला तर तोही त्याचा भ्रमच होय. २२. आत्मा मूळचा ज्ञानरूप असतांना सत्त्वगुणासंबंधीं 'मी स्वतः ज्ञानरूप परमात्मा आहें' असें म्हणेल तर तेंच ज्ञान भ्रम व तोच बंध होय. २३. मूळ स्वरूपज्ञान विसरून गेल्यामुळें ग्रंथांतून वृत्तिरूप ब्रह्मज्ञानानें पुष्कळ वर्णन केलेलें आहे; आम्हांस त्याचें महत्त्व वाटत नाहीं. ज्ञानानें मोक्ष घडतो हें खरें. २४. मूळची जी अविद्या, जिच्यापासून परा आदि चार वाणी भरभराटीस आल्या, त्यांसह या जीवानें देहत्याग. केल्यावर ती स्वतःहि नाश पावते. २५. शरीररूपीं लांकडें हीं कंटाळून ज्ञानरूपीं अग्नींत शिरलीं तरी त्यांचा समूळ नाश न होतां बोधरूपीं भस्माचा अंश उरतोच. २६. भस्म अंगाला लावल्यावर त्याचें स्थूल परमाणू, कण जरी दिसेनासे होतात, तरी ते अंगावर असतात. २७. पाण्यांत मिसळल्यावर कापुराचें अस्तित्व झांकत नाहीं, वास पाण्याला येतोच. २८.

ना वोहळला आंगीं जैसें । पाणी पाणीपणें नसे । तऱ्हीं वोल्हासाचेनि मिसें । आथीच ते ॥ २९ ॥ नातरी माध्यान्ह-काळीं । छाया न दिसे वेगळी ॥ असे पायातळीं । रिगोनियां ॥ ३० ॥ तैसें ग्रासूनि दुसरें । स्वरूपीं स्वरूपाकारें ॥ आपुलेपणें उरे । बोध जो कां ॥ ३१ ॥ तें ऋणशेष वाचा इया । न फेडवे मरोनिया ॥ तें पाया पडोनि मियां । सोडविलें ॥ ३२ ॥ म्हणोनि परा पश्यंति । मध्यमा हन भारती ॥ या निस्तरिलिया लागती । ज्ञानी अज्ञानींची ॥ ३३ ॥

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते वाचाऋणमोचनं नाम तृतीयप्रकरणं संपूर्णम् ॥ शुभं भवन्तु**

---

ओहळाला पाणी नसलें तरी जागोजागींच्या ओलसरपणावरून ओहोळ कळतो. २९. बारा वाजण्याच्या वेळीं आपली छाया वेगळी दिसत नाहीं; पण ती पायांखालीं लपून असते. ३०. त्याप्रमाणें अद्वैती बनून मूळ परमात्मा स्वरूपाच्या ठिकाणीं स्वबोधाच्या आपलेपणानें उरतोच. ३१. तेंच हें वाचा-ऋणशेष होय. आपण मरून तें फेडावें म्हटलें तरी तें फिटत नाहीं. म्हणून मी (श्रीगुरूचें) चरण वंदून, फेडलें. ३२. म्हणून ज्ञानी व अज्ञानी अशा सर्व पुरुषांनीं या परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी चार वाणींचें ऋण फेडावें. ३३.

याप्रमाणें श्रीअमृतानुभव ग्रंथातील वाचाऋणमोचन नांवाचें तिसरें प्रकरण संपलें.

**प्रकरण तिसरें समाप्त**

—×—

# प्रकरण चौथें

आतां अज्ञानाचेनि मारें । ज्ञान अभेदें वावरे ॥ नीद साधूनि जागरें । नांदिजे जेवि ॥ १ ॥ कां दर्पणाचा निघाला । ऐक्य-बोधू पहिला ॥ मुख भोगी आपुला । आपणचि ॥ २ ॥ ज्ञान जिया तिया परी । जगीं आत्म्यैक्य करी ॥ तैं सुरिया खोंचे सुरी । तैसें जाहलें ॥ ३ ॥ लावी आत ठाउनि कोपट । तो साधी आपणया सकट ॥ कां बांधलेया चोरट । मोटेमाजी ॥४॥ आगी पोतासाचेनि मिसें । आपणपें जाळिलें जैसें । ज्ञाना-ज्ञाननाशें । तैसें जाहलें ॥५॥ अज्ञानाचा टेका । नसतांही ज्ञान अधिका । फांके जंव उफका । आपुला पडे ॥ ६ ॥

---

निद्रेच्या नाशानें केवळ जागृतीच नांदते, त्याप्रमाणें अज्ञानाला मारून ज्ञानच अभेदानें सर्वत्र व्याप्त असतें. १. अथवा आपल्या मुखाहून भिन्न प्रतिबिंब आरशांत दिसूनहि पाहणारा प्रतिबिंबाशीं असलेली मूळ मुखाची एकतेची जाणीव अनुभवतोच.२.वेगवेगळ्या प्रकारानें ज्ञान जगाशीं आत्म्याचें ऐक्य घडवितें असें म्हणणें म्हणजें सुरीनें सुरीला खोचल्याप्रमाणें होईल. ३. कोशकिडा घरटें तयार करून त्यांत शिरतो व दार बंद करून आपला आपणच नाश करून घेतो; किंवा चोरी केलेल्या पदार्थाचें गाठोडें बांधून चोर भीतीनें त्यांतच आपण शिरतो, म्हणजे चोरी केलेल्या पदार्थासह धन्याच्या हातीं जाऊन पडतो. ४. किंवा अग्नि कापुराला जाळण्याच्या मिषानें स्वतःचा नाश करून घेतो, त्याप्रमाणें ज्ञान अज्ञानाचा नाश करण्याच्या मिषानें स्वतःला नष्ट करते. ५. अज्ञानाचा आधार नसतांनाहि ज्ञान अधिक वाढून स्वतःचा नाश करून घेतें. ६.

वात दशाही ते निमालियां । येणें जें ये उजाया ॥ तें केवळ नाशावया । दीपाचे परी ॥ ७ ॥ उठणे कीं पडणें । कुच-भाराचे कोण जाणे ॥ कां फाकणें कीं सुकणें । जाउळाचें ॥ ८ ॥ तरंगाचें रूपा येणें । तयाचि नांव निमणें ॥ कां विजूचें उदेजणें तोचि अस्तु ॥ ९ ॥ तैसें पिऊनि अज्ञान । तंववरी वाढे ज्ञान । जंव आपुलें निधन । निःशेष साधे ॥ १० ॥ जैसें कल्पांतीचें भरितें । स्थळां जळां दोहींतें ॥ बुडविल्या अरौतें । राहोंचि नेणें ॥ ११ ॥ कीं विश्वाही वेगळ । वाढे जैं सूर्यमंडळ ॥ तैं तेजतम निखिळ । तेंचि होये ॥ १२ ॥ नाना नीद मारोनी । आपणपें हिरोनी ॥ जागणें ठाके होउनी । जागणेंचि ॥ १३ ॥ तैसें अज्ञान आटोनियां । ज्ञान ये तें उवाया ॥ ज्ञानाज्ञान गिळो-नियां । ज्ञानचि होये ॥ १४ ॥

---

केवळ आपला नाश करून घेण्याकरितांच वात संपण्याचे वेळीं दिवा मोठा होतो. ७. स्तनांचे उठणें तेंच पडणें, किंवा जाईच्या फुलाचें तेंच सुकणें. ८. तरंग उत्पन्न होणें तोच त्याचा नाश किंवा वीज उत्पन्न होणें म्हणजेच तिचा नाश. ९. त्याप्रमाणें अज्ञानाचा नाश करून ज्ञान किती वेळ असतें तर आपला निःशेष नाश होईपर्यंत असतें ! १०. प्रलयाच्या वेळीं पाणी वाढलें कीं, स्थळ व जळ या दोघांचा नाश करून सर्वत्र जलच असतें. ११. किंवा सूर्यमंडळ विश्वापेक्षांहि वाढलें म्हणजे अंधार व उजेड दोन्ही नाहींशीं होऊन केवळ सूर्यमंडळ असतें. १२. अगर झोंप गेल्यावर जागृतीहि जाते व केवळ स्वरूपाची जागृति असते. १३. त्याप्रमाणें अज्ञानाचा नाश करून ज्ञान उत्कर्षाला येतें व त्याचाहि उत्तरक्षणीं नाश होतो. १४.

**तें वेळीं पुनिवा भरे । ना आवसा सरे ॥ तें चंद्रचि उरे । सतरावी जैशी ॥ १५ ॥ कां तेजांतरें नाटोपे । कोणें तमें न शिंपे ॥ ते उपमेचें जाउपे । सूर्यचि होय ॥ १६ ॥ म्हणोनि ज्ञानें उजळें । कां अज्ञानें रुळे ॥ तैसें नव्हे निर्वाळें । ज्ञानपात्र जे ॥ १७ ॥ परी ज्ञानपात्रें निखळें । तेंचि कीं तया कळे ॥ काई देखिजे बुबुळें । बुबुळा जेवी ॥ १८ ॥ आकाश आपणपया रिघे । काइ आगी आपणया लागे । आपुला माथा वळघे । आपण कोण्ही ॥ १९ ॥ दिठी आपणया देखे । स्वाद आपणया चाखे ॥ नादु आपुलें आइके । नादपण ॥ २० ॥ सूर्य सूर्यासी विवळे । कां फळ आपणया फळे । परिमळु परिमळे । घेपत असे ॥ २१ ॥**

---

चंद्राचें मूळ रूप पार्णिमेला वाढत नाहीं किंवा अमावस्येला कमी होत नाहीं. ती सतरावी कलाच. १५. जो अन्य प्रकाशानें आटोपत नाहीं किंवा झांकला जात नाहीं. अशीं उपमा ज्या मुलाला देतां येईल; तो सूर्य निश्चित म्हणावा. १६. विषयासक्त ज्ञानानें म्हणजेच अज्ञानानें झाकाळत नाहीं किंवा परमात्म्यासंबंधींच्या परोक्ष ज्ञानानें जळत नाहीं असें ब्रह्मज्ञान हें शुद्ध द्वैतातीत आहे. १७. एवढें मात्र खरें कीं जें शुद्ध ज्ञान आहे, तें ज्ञान आपणा स्वतःस जाणूं शकेलच! अरे! बुबुळ हें स्वतः आपल्यास पाहूं शकेल काय? १८. आभाळ आपणांतच शिरूं शकेल काय? अग्नि स्वतःला पोळूं शकेल काय? स्वतःच्या आपल्या डोक्यावर कोणी चढूं शकेल काय? १९. दृष्टि स्वतःला पाहूं शकेल काय? स्वाद आपला स्वाद आपण चाखूं शकेल काय? आवाज स्वतःला ऐकूं शकेल काय? २०. सूर्य आपल्याला प्रकाशित करूं शकेल काय? फल आपल्यालाच फल देईल काय? वास आपलाच वास घेऊं शकेल? २१.

**तैसें आपणया आपण । जाणतें नव्हे जाण ॥ म्हणोनि ज्ञानपणें-वीण । ज्ञानमात्र जें ॥ २२ ॥ आणि ज्ञान ऐशी सोये । ज्ञानपणचि जरी साहे ॥ तरी अज्ञान हें नोहे । ज्ञानपणेंचि ॥ २३ ॥ जैसें तेज जें आहे । तें अंधारें कीर नव्हे ॥ मा तेज तरी होये । तेजासी काई ॥ २४ ॥ तैसें असणें आणि नसणें । हें नाहीं जया होणें ॥ आतां मिथ्या ऐसें येणें । बोलें गमे ॥ २५ ॥ तरी कांहीं नाहीं सर्वथा । ऐसी जरी व्यवस्था ॥ तरी नाहीं हें प्रथा । कवणासी पां ॥ २६ ॥ शून्यसिद्धांतबोधु । कोणी सत्ता होय सिध्दु ॥ नसता हा अपवादु । वस्तूसी जो ॥ २७ ॥ माल्हविता दिवे । माल्हवितें जरी माल्हवे ॥ तरी दीपु नाहीं हें फावे । कवणासी पा ॥ २८ ॥**

---

म्हणजेच स्वरूपभूत ज्ञान आपलें आपल्याला जाणणें शक्य नाहीं. त्याप्रमाणें स्वरूपभूत ज्ञान जाणणेंपणावांचून केवळ ज्ञानमात्रच आहे. २२. ज्ञानरूप परमात्म्यावर ज्ञानाचा अधिकार चालेल तर परमात्मरूपच ज्ञान अज्ञान होणार नाहीं का ? २३. जे तेज आहे, तें अंधार तर नाहींच ! मग तेजाला, 'तें तेज आहे,' असें तरी कसें म्हणावें ? २४. या म्हण-ण्यानेंच तो मिथ्या म्हणजे शून्य आहे. हें सहजच सिद्ध होतें. कारण ज्ञानरूपानें असणें किंवा नसणें हे दोन्ही धर्म ज्या परमात्म्याच्या ठिकाणीं नाहीत. २५. अशी स्थिति असेल तर 'सर्वथा कांहीं नाहीं' असें ज्ञान कोणास होतें ? २६. कांहीं हा शून्यवाद्यांचा सिद्धांत आहे. त्याचें ज्ञान कोणाच्या सत्तेवर होतें ? शून्यत्व हा वस्तूवर आरोप आहे. २७. दिवा मालवणारा जर दिवा मालवल्यावर नाहींसा झाला तर 'दिवा नाहीं' हें कोणास कळणार ? २८.

**कीं निदेचेनि आलेपणें । निदेलें तें जाय प्राणें ॥ तरी नीद भली हें कोणें । कोणासी षा ॥ २९ ॥ घटु घटुपणें भासे । तद्भंगें भंगु आभासे ॥ सर्वथा नाहीं तैं नसे । कोण्हे म्हणावें ॥ ३० ॥ म्हणोनी कांहीं नाहीं पण । देखता नाहीं आपण ॥ नोहोनी असणेंनवीण । असणें जे ॥ ३१ ॥ परि आणिका कां आपणया । न पुरे विखो होआवया ॥ म्हणोनी न असावया । कारण कीं ॥ ३२ ॥ जो निरंजनीं निदेला । तो आणिकीं नाहीं देखिला । आपुलाही निमाला । आठवु तया ॥ ३३ ॥ परी जीवें नाहीं नोहे । तैसें शुद्ध असणें आहे ॥ हें बोलणें न साहे । असेनाहींचें ॥ ३४ ॥**

---

निद्रित पुरुष जर मेला तर 'झोंप चांगली लागली होती' हें ज्ञान कोणास होणार ? २९. घट आहे म्हणून घटपणाचें ज्ञान होतें व तो फुटला तर त्याच्या अभावाचें ज्ञान होतें. पण मुळींच घट नसेल तर 'नाहीं' असें म्हणावें तरी कोणी? ३०. ज्ञानरूप आत्मा नाहींपणा व आहेपणा हीं दोनहि पाहात नाहीं, यावरून आत्मज्ञान 'आहे-नाहींपणा-वांचून' आहेपणानेंच असतें. ३१. दुसऱ्याला किंवा योग्य आपल्याला विषय होण्याला शुद्ध परमात्मा नाहीं; यावरून तो मुळींच नसावा असें म्हणावयास कारण घडतें. ३२. एखादा माणूस जंगलांत निजला आहे; त्याकडे लोक बघत नाहींत, त्या माणसाला स्वतःचेंही स्मरण नसलें तरी ३३. त्यावरून तो माणूस जिवंत नसतो असें नाहीं. परमात्म्याचें शुद्ध स्वरूप याप्रकारचें 'असणें' आहे; येथें आहे-नाहींचें बोलणें लागूं पडत नाहीं. ३४.

**दिठी आपणया मुरडे । तैं दिठीपणही मोडे ।। परी नाहीं नोहे हें फुडे । जाणेंचि ते ।। ३५ ।। कां काळ राहे काळवखा । तो आपणा ना आणिकां ।। न चोजवे तऱ्ही आसिका । हा मी बाणे ।। ३६ ।। तैसें असणें कां नसणें । हें कांहींच मानूसवाणे ।। असोनि असणे । ठायें ठावो ।। ३७ ।। निर्मळपणीं आपुला । आकाशाचा संचु विराला ।। तो स्वयें असे पुढिला । कांहीं ना कीं ।। ३८ ।। कां आंगीं कीं निर्मळपणीं । हारतलिया पोखरणीं ।। हें आणिका वांचूनि पाणी ।। सगळेंच आहे ।।३९।। आपणया भागू तैसें । आपणेंचि जें असे ।। असेंनाहीं ऐसें । सांडूनियां ।। ४० ।।**

---

दृष्टीचें पाहणेंपण ती मागें वळून आपल्याकडे पाहतें तेव्हां मोडतें; पण तीं नाहीं असें मात्र नव्हे; कारण पाहाणेंपण हें तिचें रूप आहे. ३५. किंवा रंगानें काळा माणूस अमावास्येला अंधारांत उभा राहिला तर तो आपल्यास व दुसऱ्यास दिसत नाहीं. तरीहि 'मी आहे' हें ज्ञान त्यास नक्की असते. ३६. त्याप्रमाणें परमात्म्याचे ठिकाणीं असणें अगर नसणें हें कांहींच मानण्यासारखें नाहीं; कारण परमात्मा स्वतःच्या ठिकाणीं आहे तसाच आहे. ३७. स्वभावतः स्वच्छ आकाशाची व्याप्ति इतर वस्तूंच्या सान्निध्यामुळें विकृत दिसली तरी तें स्वस्वरूपतेंत असतें तसेंच असतें, फक्त बघणारास तसें दिसत नाहीं. ३८. किंवा झऱ्याचें स्वच्छ पाणी आटलें असतां तें तेथें पाणीपणानें असतें, पण पाहणारास मात्र तसें दिसत नाहीं. ३९. त्याप्रमाणें आत्मस्वरूपाच्या बाजूनें पाहिलें असतां, आत्मा, आहेपण व नाहींपण सोडून, मूळ असणेंपणानेंच असतो. ४०.

निंदेचे नाहींपण। निमालियाही जागेपण॥ असिजे कां नेण। कोणी होऊनि जैसे ॥४१॥ कां भूमि कुंभ ठेविजे। तैं सकुंभता आपजे॥ तो नेलिया म्हाणिजे। तेणेंविणें ॥४२॥ परी वेळीं हें भाग। न शिवती भूमीचें आंग॥ तें वेळीं भूमि तैसे चांग। चोख जें असणें ॥४३॥

**इति श्रीसिद्धानुवाद श्रीमदनुभवामृते ज्ञानअभेदकथनं नाम चतुर्थप्रकरणं संपूर्णम्॥**

---

झोंप संपल्यावर तत्संबधीं जागृतीचें ज्ञान असतें, पण तेंहि गेल्यानंतर मग निद्रा व जागेपणा असतो, पण त्याचें भान मात्र नसतें. ४१. घट जमिनीवर ठेविला असतां तिला 'सकुंभता' येते. तो घट बाजूला केल्यावर 'निकुंभता' येते. ४२. पण या दोन्ही धर्मांचा जमिनीला स्पर्श न होतां ती मूळ रूपांत कायम असतें. हें जसें, तसें आत्म्याचें रूप चोख म्हणजे शुद्ध, सर्वधर्मरहित शब्दाच्या पलीकडचें आहे. ४३.

याप्रमाणें श्रीमत् अमृतानुभव ग्रंथांतील ज्ञानाज्ञान-भेदकथननामक चौथें प्रकरण समाप्त झालें.

**प्रकरण चौथें समाप्त**

—×—

# प्रकरण पांचवें

सत्ता प्रकाश सुख । या तिहीं तिहींउणे लेख ॥ जैसें विष-पर्णेचि त्रिख । विखा नाहीं ॥ १ ॥ कांति काठिण्य कनक । तिन्ही मिळोनि कनक एक । द्राव गोडी पियूख । पीयूखाचि जेवि ॥२॥ उजाळ दृति मार्दव । या तिहीं तिहीं उणीव ॥ हे देखिजे सावेव । कापुरीं येके ॥३॥ आंगे कीर उजाळ । कीं उजाळतांचि मवाळ ॥ कीं दोन्ही ना परिमळ । मात्र जे ॥४॥ ऐसे ये कापूरपणीं । तिन्हीं इये तिहीं उणी ॥ इयापरी आटणी । सत्तादिकांचा ॥५॥ येऱ्हवी सच्चिदानंद भेदें । चालिलीं तिन्हीं पदें ॥ परी तिन्हीं उणीं आनंदें । केलीं येणें ॥ ६ ॥

---

सत्ता, प्रकाश व सुख या तीन शब्दांचा प्रयोग, असत्, जड व दुःख यांची व्यावृत्ती करण्याकरितां श्रुतीनें केला आहे. म्हणून स्वगतभेद होत नाहीं. १. जसें विष विषपणानेंच असल्यामुळें ते स्वतःला विष होत नाहीं. सोनें जसें तेज, कठीणपणा व पिवळेपणा हे तिन्हीं मिळून होते, अथव, पातळपणा, गोडी व पांढरेपणा हें तिन्हीं मिळून दूध; २. पांढरेपणा सुगंध, मऊपणा हे तीनही धर्म त्या एकमेकांत नसतात, तरी कापुराच्या ठिकाणी दिसतात; ३. अंगचा स्वच्छपणा तोच मऊपणा आणि हे दोन्ही मिळून परिमलमात्र जसा एक कापूरच; ४. आपल्या विरोधी धर्माचा निषेध करणारे हे तीन धर्म एका कापूरपणांत परिमळपात्रांत जसें एकवटतात, तसा सत्तादिपदाचा आनंदस्वरूप ब्रह्मांत एकमेळ होतो. ५. इतर वेळी सत, चित् आणि आनंद हीं तीन पदें आपल्याला वेगळ्या अर्थांनीं चालतात, पण या एका परमात्म्यानें त्यांना अभिन्न केलें. ६.

**सत्ताचि कीं सुखप्रकाशु । प्रकाशूचि सत्ता उल्हासु ॥ हे न निवडे मिठांशु । अमृतीं जेवीं ॥ ७ ॥ शुक्लपक्षीच्या सोळा । दिवसा वाढती कळा ॥ परी चंद्र मात्र सगळा । चंद्रीं जेवीं ॥८॥ थेंबीं पडतां उदक । थेंबा धरुं ये लेख ॥ परी पडिलाठायीं उदक । वांचूनि आहे ॥ ९ ॥ तैसें असताचिया व्यावृत्ति । संत म्हणूं आले श्रुति ॥ जडाचिया समाप्ती । चिद्रूप ऐसें ॥ १० ॥ दुःखाचेनि सर्व नाशें । उरलें तें सुख ऐसें ॥ निगदिलें विश्वासें । प्रभुचेनी ॥ ११ ॥ ऐशी सदादि प्रतियोगिये । असदादि तिन्हीं ये ॥ लोटितां जाली त्राये । सत्तादिकां ॥ १२ ॥**

---

अमृतांतील गोडी ही जशी वेगळी काढतां येत नाहीं, त्याप्रमाणें सत्‌रूपी आत्मा चित्‌रूप व आनंद आहे कीं, चित्‌रूप आत्मा सत्‌रूप व आनंद आहे, याचा भेद दाखवितां येणार नाहीं. ७. शुद्ध पक्षांत प्रत्येक दिवशीं एकेका कलेनें पूर्ण होत तो चंद्र शेवटीं पूर्ण होतो; तरी या सर्व घडामोडींत चंद्र मात्र सर्वस्वीं एकच असतो. ८. पाऊस थेंबाथेंबानें पडतो. जर हे थेंब मोजून एकत्र करावयाचे ठरवलें तर पाण्याशिवाय दुसरे तेथें काय दिसेल ? ९. त्याचप्रमाणें असताच्या निरसनासाठी श्रुति ' सत् ' असे म्हणूं लागल्या. अचेतनाच्या निरसनासाठीं ' चित् ' म्हणूं लागल्या, सर्व दुःखांच्या निवृत्तीनंतर जें असतें त्याचप्रमाणें असताचे निराकरण करण्याकरितां सत शब्दाचा प्रयोग केला व जडाच्या निवृत्तीकरितां चित् शब्द योजला. १०. सुख हे दुःखाचा नाश झाल्यावर उरते. दुःखाच्या सर्वनाशाकरितां प्रभूचा निश्वास जो वेद त्यानें सुखशब्दाचा प्रयोग केला आहे. ११. सदादि तीन शब्दांनीं प्रतियोगी असदादि तीन शब्दांचा नाश केला; व यांच्या नाशाबरोबर ' सदादि ' आपोआप नष्ट झालें. १२.

**एवं सच्चिदानन्दु । आत्मा हा ऐसा शब्दु ॥ अनन्यवृत्तिसिध्दु । वाचक नव्हे ॥ १३ ॥ सूर्याचेनि प्रकाशें । जें कांहीं जड आभासे ॥ तया तो गिवसे । सूर्य काई ॥ १४ ॥ तेवि जेणें तेजें । वाचेसी वाच्य सुजे ॥ ते वाचा प्रकाशिजे । हें कें आहे ॥ १५ ॥ विषो नाहीं कोणाही । जया प्रमेयत्वचि नाहीं ॥ तया स्वप्रकाशा काई । प्रमाण होये ॥ १६ ॥ प्रमेयपरिच्छेदें । प्रमाणत्व नांदे ॥ तीं काई स्वतःसिद्धे । वस्तूच्या ठाईं ॥ १७॥ एवं वस्तूशीं जाणों जातां । जाणणेंचि वस्तू तत्त्वता ॥ मग जाणणें आणि जाणतां । कैचा उरे ॥ १८ ॥**

---

याप्रमाणें श्रुतीनें ' सच्चिदानंद आत्मा ' असा केलेला शब्दप्रयोग निराळेपणानें न राहतां मूळ शुद्ध परमात्म स्वरूपांतच लयाला जातो; १३. यच्चयावत् जड पदार्थ सूर्यप्रकाशानें प्रकाशित होतात, त्या जड पदार्थाकडून सूर्य प्रकाशित केला जाईल का? १४. त्याप्रमाणें ज्या परमात्म्याच्या ज्ञानानें वाणी सर्व जड-वाच्य घटादिकांचे तेजरूपानें ज्ञान करून देतें तीं वाणी स्वयंप्रकाशरूप परमात्म्याची ओळख करून देईल काय? १५. परमात्म्याला प्रमेयत्व नाहीं म्हणून तो कोणालाही विषय होत नाहीं. मग या स्वयंप्रकाश आत्म्याची सिद्धि प्रमाणांनीं कशी होणार बरें? १६. प्रमाणाला प्रमाणत्व हे प्रमेयाला व्यापून येते; म्हणजे प्रमाण प्रमेयाचे ज्ञान करून देतें; परंतु स्वतःसिद्ध परमात्मवस्तूच्या ठिकाणीं प्रमाणांचा कितीसा प्रभाव पडणार? १७. आत्मवस्तूला विषय करून याप्रमाणें जाणावयाचे म्हटले तर वस्तू ज्ञानरूपच असल्यामुळें जाणणें व जाणणारा हा भेद राहीलच कसा? १८.

**म्हणोनी सच्चित्सुख । हे बोल वस्तुवाचक ॥ नव्हती हें शेष विचारांचें ॥१९॥ ऐसेन इयें प्रसिद्धें । चाललीं सच्चिदानंदपदें ॥ मग द्रष्टया स्वसंवादे । भेटती जेव्हां ॥ २० ॥ ते वेळीं वरषोनी मेघु । समुद्र होऊनि वोघु ॥ सरे दाऊनी मागु । राहे जैसा ॥२१॥ फळ विऊनी फूल सुके । फळ नाशे रसपाकें ॥ तोही रस उपखे । तृप्तिदानीं ॥२२॥ कां आहुति अग्नीआंत । घालूनि वोसरे हात ॥ सुख चेवऊनि गीत । उगा राहे ॥ २३ ॥ नाना मुखा मुख दाऊनी । अरिसा जाय निघोनि ॥ कां निदेलें चेवउनी । चेवितें जैसें ॥२४॥ तैसें सच्चिदानंदा चोखटा । दाऊनि द्रष्टया द्रष्टा ॥ तिन्हीं पदें लागती वाटा । मौनाचिया ॥ २५ ॥**

---

म्हणजेच सत्, चित्, सुख हें शब्द वस्तुवाचक नाहीत; हेंच सर्व विचारमंथनाचें तात्पर्य आहे. १९. सच्चिदानंदादि शब्दाचा उपयोग इतक्या मर्यादेंतच आहे. द्रष्टयाला आपल्या वास्तविक स्वरूपाचा जेंव्हां बोध होतो, २०. त्याप्रमाणें मेघ वर्षून, नदीचा ओघ समुद्राला मिळाल्या-वर संपतो; चोरीस गेलेल्या पदार्थांचें ठिकाण दाखवून, माग संपतो. २१. फळाला जन्म देऊन फूल सुकते, रस तयार केल्यावर फळ नाहींसें होते व तृप्ती देऊन रसहि लुप्त होतो. २२. अग्नींत आहुति घालून हात माघारी फिरतो, किंवा सुख देऊन गाणें बंद होते. २३. मुखाला मुख दाखविल्यावर आरशाचे काम संपते, किंवा निजलेल्या पुरुषाला जागें करून, जागा करणारा निघून जातो; २४. त्याप्रमाणें सच्चिदानंद हीं तीन पदें ज्ञात्याला आपलें यथार्थ परमात्मरूप दाखवून आपण मौन स्वीकारतात. २५.

**जें जें बोलिजे तें तें नव्हे । होय तें तंव न बोलवे ।। साउलि-वरी न मववे । मविते जैसें ।।२६।। मग आपुलियाकडे मवितया से पडे ।। तैं लाजलाजों आखुडे । मविती जैसी ।। २७ ।। तैसी सत्ताचि स्वभावें । असत्ता तंव नव्हे ।। मा सत्तात्व संभवे । सत्तेसी काई ।।२८।। आणि अचिदाचेनि नाशें । आलें जें चिन्मात्रदशे ।। आतां चिन्मात्रचि मा कैसें । चिन्मात्रीं ये ।। २९ ।। नीद प्रबोधाच्या ठाईं । नसे तैसें जागणेंही ।। तेवि चिन्मात्रचि मा काई । चिन्मात्रीं ये ।। ३० ।। ऐसें यया सुखपणें । नाहीं कीरु दुःख होणें ।। मा सुख हें गणणें । सुखाशीं काई ।। ३१ ।। म्हणोन सदसद्त्वें गेलें । चिदाचिद्त्वें मावळलें ।। सुखासुख जालें । कांहीं ना कीं ।। ३२ ।।**

---

ज्याप्रमाणें आपलें माप सावलीवरून घेतांच येत नाहीं, त्याप्रमाणें प्रतिपादन करतांना जें जें बोलण्यांत येते, तें तें आत्मा नव्हे, वस्तुस्वरूप शब्दाला विषय होणारें नसते. २६. मग माप घेणाराला आपल्या शरीराची आठवण होते तेव्हां लाज वाटून तो आपली स्वतःच किंमत ओळखतो ! २७. स्वभावानें सर्वत्र परमात्म्याचेंच अस्तित्व आहे. असत् तर नाहींच, मग 'सत् आहे' असे बोलणें संभवेल काय ? २८. अचिदाची निवृत्ति करण्यासाठीं चिन्मात्रदशेला आलें, त्याला 'चिन्मात्र' असें म्हणणे संभवेल का ? २९. निद्रेसबंधीं आपली साक्षेप जागृति गेल्यावर जागृति स्वरूपानें असते, त्याप्रमाणें चिन्मात्र स्वरूपाच्या ठिकाणीं चिन्मात्र म्हणणें कसें संभवणार ? ३०. केवळ सुख हेंच ज्याचें स्वरूप आहे, दुःख संबंध नाहींच अशा परमात्म्याला तो सुख म्हणजे आनंद आहे असें कसें म्हणावें ? ३१. म्हणजे सत् हें पद असत् पदासह नाहींसें झालें; चित अचित्सह मावळले, आणि दुःखांची निवृत्ति करून सुख हें पद आपण स्वतःहि नष्ट झालें कीं साक्षेप असें कांहींच शिल्लक उरत नाहीं. ३२.

**आतां द्वंद्वाचे लवंचक । सांडुनि दुणीचें कंचुक ॥ सुखामात्रचि येक । स्वयें आथी ॥ ३३ ॥ वरी येकपणें गणिजे । तें गणतेनसी दुजे ॥ म्हणोनी हें न गणिजे । ऐसें एक ॥ ३४ ॥ सुखा आंतोनी निघणें । तें सुखियें सुखी तेणें ॥ हें सुखामात्रचि मा कोणें । अनुभवावें ॥ ३५ ॥ जैं प्रकृति डंकु अनुकरे । तैं प्रकृति डंके अवतरे ॥ मा डंकूचि तैं भरे । कोण कोणा ॥३६॥ तैसें आपुलेनि सुखपणें । जया नाहीं सुखावणें ॥ आणि नाहीं हेंही जेणें । नेणिजे सुखें ॥ ३७ ॥ आरिसा न पाहतां मुख । स्वयें सन्मुख ना विन्मुख । तेवीं नसोनी सुखासुख । सुखाचि जें ॥३८॥ सर्वसिद्धांताच्या उजरिया । सांडूनिया निदसुरिया ॥ आपुलिया हाता । चोरिया आपणाचि जे ॥३९॥**

---

भेदाचें लवंचक म्हणजे मिथ्याभान म्हणजे विक्षेप. आणि त्याला कारण अज्ञानाचें आवरण, त्याच्या नाशानें सुखमात्रच स्वस्वरूपानें असते. ३३. आता एकपणानें मोजले तर मोजणारा द्वैत ठरतो, म्हणजे हें न मोजतां येण्यासारखे आहे. ३४. तसेंच मुखांतून निघणारा त्या सुखानें सुखी होईल, पण ही वस्तु केवळ सुखमात्रच असल्यामुळेंच त्याचा अनुभव कोणीं घ्यावा? ३५. जेव्हां पुरुषास प्रकृतीचा दंश होतो, तेव्हां माणूस घुमतो. एखादा मग केवळ दंशच असेल आणि माणूस नसेल तर त्या दंशानें कोणाला दंश करावा? आणि घुमावें तरी कोणीं? ३६. त्याप्रमाणें परमात्मा स्वतः सुखरूप असल्यामुळें, त्याला सुख होणें नाहीं आणि सुख नाहीं हेंहि म्हणणें मूळ सुखापुढें योग्य नाहीं. ३७. आरशांत मुख न पाहतां मुखाला समोर किंवा मागें अशी स्थिति नसते; त्याप्रमाणें सुखदुःखशून्य जे केवळ सुखच परमात्मा असतो. ३८. अज्ञानाच्या नाशासंबंधीं शास्त्रांतील पांडित्यानें भरलेलें ज्ञान न समजल्यामुळें कांहीं हातचें—मुळांतील—ज्ञान मिळविणें शिल्लक राहावें तसा सुखरूप परमात्मा स्वरूपानें राहतो. ३९.

**न लविता ऊंस । तें जैसेनि असे रस ।। तर्थीचा मिठांश । तोचि जाणे ।।४०।। कां न सज्जिता विणा । तो नादु जो अबोलणा । तया तेणेंचि जाणा होआवें लागे ।।४१।। नाना पुष्पचिया उदरा । न येता पुष्पसारा ।। आपणचि भवरा । हों आवें पडे ।।४२।। नाना न रांधिता रससोयें । ते गोडी कैशी पा आहे ।। हें पाहणें तैसें नोहे । आणिका जोगी ।।४३।। तैसें सुखपणा येवो । लाजे आपुलें सुख पावो । तें अणिका चाखो सुवों । येईल काई ।।४४।। दिहाच्या दुपारीं । चांदू जैसा अंबरीं ।। तें असणे चांदावरी । जाणावें कीं ।।४५।। रूप नाहीं तैं लावण्य । अंग नुठी तैं तारुण्य ।। क्रिया न फुटे तैं पुण्य । कैसें असे ।।४६।।**

---

ऊंस न लाविला तरी त्यांतील रस कायम असून त्यांतील गोडी चाखलेली नसते. ४०. वीणा जरी वाजविण्यासाठीं जुळवला नाहीं तरी तिच्यातला नाद सुप्त असतो आणि तो इतरांना प्रत्यक्ष ऐकूं येत नाहीं. ४१. फुलांचा मकरंद घेणारा भ्रमर न आला तर त्या मकरंदालाच भ्रमर होऊन पडावें लागतें. ४२. अनेक प्रकारचें पाक न केलें तर त्यांच्यातील गोडी कशी आहे, ती इतरांना कशी समजणार ? त्यांचे तेच जाणोत ! ४३. त्याप्रमाणें मूळ सुख हे प्राकृतिक रूपानें सुख म्हणून लाजून पुढें येत नाहीं, तर मग ते बिचारे इतरांना काय सुख देणार ? ४४. भर दिवसा आकाशांत चंद्र असूनहि त्याचें चांदणे अनुभवास येत नाहीं. अनुमानावें लागते. ४५. रूप नसणारें लावण्य, वार्धक्यांतले तारुण्य किंवा कांहीं दान न देतां केलेले पुण्य; या गोष्टी अस्तित्वात असतीलच कशा ? ४६.

**जैं मनाचा अंकुर नुपजे। तेथलेन मकरध्वजें॥ तोचि हन माजे। तरीच घडे ॥ ४७ ॥ कां वाद्यविशेषाची सृष्टि। जैं जन्म नेघे दृष्टीं ॥ तैं नाद ऐशी गोष्टी। नादाचि जोगी ॥ ४८ ॥ नाना काष्ठाचिया विटाळा। वोसरलियाही अनळा। लागणें केवळा। आंगासीचि ॥ ४९ ॥ दर्पणाचेनि नेमें। विणाचि मुख प्रेमें॥ आणिती तेंचि वर्मे। वर्मती येणें ॥५०॥ न पेरितां पिक जोडे। तें मुडाचि आहे रोकडें॥ ऐशिया सोई उघडे। बोलणें हें ॥५१॥ एवं विशेष सामान्य। दोहीं नातळे चैतन्य॥ तें भोगिजे अनन्य। तेणेंसी सदा ॥ ५२ ॥ आतां यावरी जें बोलणें। तें येणेंचि बोलें शहाणे॥ जें मौनाचेंही निपटणें। पिऊनि गेले ॥ ५३ ॥**

---

किंवा मनाचा अंकुर उत्पन्न झालेला नसेल अशा स्थितींतील काम प्रकट होतो. ४७. अथवा निरनिराळीं वाद्यें वाजवितांना ऐकली नाहींत तोपर्यंत नादांची स्थिति स्वतः नादालाच माहीत. ४८. लांकडाचा संबंध सोडल्यावर अग्नि आपल्या केवळ स्वरूपानेंच असतो. ४९. आरशावांचून आपल्या मुखाचें ज्ञान ज्यास होते, त्यासच गुप्त परंतु निश्चित या गोष्टींतील रहस्य कळेल. ५०. पेरण्याच्या पूर्वी पीक जसें भाताच्या मुढ्यांत असते, तसें आमचे गुप्त, पण उघड बोलणें आहे. ५१. एवंच, सामान्यविशेष भावाला चतन्य आकळलेंच जात नाहीं, उलट ते स्वस्थितींत भावशून्य आपल्याशींच सर्वदा अनन्य असते. ५२. यापुढें विवरण असें करतां येईल कीं, मौनसुद्धां त्या स्थितींत निःशेषपणानें नाहींसें होते. ५३.

**एवं प्रमाणें अप्रमाण। पण केलें प्रमाण ॥ दृष्टांतीं वाइली आण। दिसावयाची ॥ ५४ ॥ आंगाचिया अनुपपत्ती ॥ आटालिया उपपत्ती। येथें उठली पांती। लक्षणांची ॥ ५५ ॥ उपाय मागिला पाये। येऊनि जाले वाये॥ प्रतीति सांडिली सोये। प्रत्ययाची॥५६॥ येथें निर्धारेंसी विचार। निमोनि जाला साचार। स्वामीच्या संकटीं शूर। सुभट्ट जैसा ॥ ५७ ॥ नाना नाश साधुनी आपुला। बोध बोधें लाजिन्नला ॥ नुसधेपणें थोटावला। अनुभवु जेथ ॥ ५८ ॥ भिंगाचिया चडळा। पदराचा पुंज वेगळा ॥ करितां जैसा निफळा। आंगाचा होये ॥ ५९ ॥ कां गजबजिला उवा। पांघुरणें केळीचा गाभा ॥ सांडी तेव्हेळी उभा। कैचा कीजे ॥ ६० ॥ तैसें अनुभाव्य अनुभाविक। इहीं दोहीं अनुभूतिक ॥ तें गेलिया कैचें एक। एकासीचि ॥ ६१ ॥**

---

आतांपावेतों प्रत्यक्षादि प्रमाणांनीं आपल्या अप्रामाण्याची सिद्धि केली; दृष्टांतांनीं पुढें न येण्याची शपथ घेतली. ५४. युक्तींनीं आपली अनुपत्ति करून घेतली, आणि लक्षणांच्या तर रांगाच्या रांगा लागल्या. ५५. योगादि नाना उपाय मागल्यामागेंच पाय काढून चालतें झालें, प्रतीतीनें प्रत्यय दाखवावयाचें टाळले. ५६. शूर योद्धा ज्याप्रमाणें आपल्या स्वामीच्या संकटकालीं आपला जीव देऊन, संकट दूर करतो, ५७. किंवा बोध आपला नाश करून घेतो व बोध म्हणवूनच घेण्याचें टाळतो; अनुभव एकटा राहिल्यामुळें पांगळा होतो, ५८. अथवा अभ्रकाचें पापुडें काढलें तर स्वतः अभ्रकाचा नाश होतो. ५९. किंवा केळीचा गाभा उष्णतेनें त्रासल्यामुळें आपल्या अंगावरचीं सोपटें काढूं लागला तर त्याला उभा कसा करावा? ६०. त्याप्रमाणें अनुभव्य, अनुभवि आणि अनुभव ही त्रिपुटी नाहींशीं झाल्यावर एकमेकांचा संबंध कसा राहाणार? ६१.

अनुभवा ही ठावोवारी । आपुलीच अनवसरी ।। तेथें अक्षराची हारी । वाइल काई ।। ६२ ।। का परेसी पडे मिठी । तेथें नादा सळु नुठी ।। मी वावरीजेल वोठी । हें कें आहे ।। ६३ ।। चेइलिया पाठी । चेवणयाच्या गोष्टी ।। कीं धाला बैसें पाठी । रंधनाच्या ।। ६४ ।। उदेलिया दिवसपती । तैं कीं दिवें सेजें येती ।। वांचूनि पिकलां शेती । सुइजताती नांगर काई ।।६५।। म्हणोनि बंधमोक्षाचें व्याज । नाहीं निमालें काज ।। आतां निरुपण भोज । वोळगे जरी ।। ६६ ।। आणि पुढिल कां आपणापें । वस्तु विसराचेनि हातें हारपें ।। मग शब्देंचि घेपे । आठवूनियां ।। ६७ ।। येतुलियाही परौते । चांगावें नाहीं शब्दातें ।। जरी स्मारकपणें कीर्तीतें । मिरवी हा जगीं ।। ६८ ।।

इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते सच्चिदानंद
पदत्रयविवरणं नाम पंचमप्रकरणं संपूर्णम् ।।

---

परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं अनुभवाची अशी दशा होते, मग त्या ठिकाणीं शब्दाची काय मातब्बरी ? ६२. ज्याचें वर्णन करतांना परावाणी लुळीं पडते, जेथें नादाची सत्ता असत नाहीं, त्या परमात्म वस्तूचें तोंडानें वर्णन करता येईल कां ? ६३. जागा झाल्यानंतर जागें करण्याच्या गोष्टी कशाला ? अगर तृप्त झालेला पुरुष स्वयंपाक करण्याच्या भानगडींत कशाला पडेल? ६४. सूर्योदय झाल्यावर दिवे मालवतात; शेत पिकल्यावर त्यांत कोणी कशाला नांगर धरील ? ६५. म्हणून बंधमोक्षाचें निमित्त नाहीं, कार्य संपलें, तरी हें निरुपण कौतुकानें प्राप्त झालें आहे. ६६. आणि दुसऱ्याला किंवा आपल्याला स्वस्वरूपवस्तूविषयीं विसर पडला असेल, तर त्या वस्तूविषयीं शब्दच स्मृति करून देतो, असा अनुभव आहे. ६७. परमात्म्याची स्मृति करून देणारा हा शब्द त्याचें स्मारक म्हणून जगांत कीर्ति मिरवीत असला तरी त्याच्याजवळ यापेक्षां जास्त चांगुलपणा नाहीं. ६८. याप्रमाणें श्रीमत् अमृतानुभवग्रंथांतील सच्चिदानंद पदत्रयविवरण प्रकरण पांचवें समाप्त झालें.

**प्रकरण पांचवें समाप्त**

# प्रकरण सहावें

**बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानीं प्रसिध्दु ॥ अमूर्ताचा विशदु । अरिसा नव्हे ॥ १ ॥ पाहते आरिसा पाहे । येथें कांहींचि नवल नव्हे ॥ परी दर्पणें येणें होये । न पाहतें पाहतें ॥ २ ॥ वडिला अव्यक्ताचिया वंशा । उद्योतकार सूर्य जैसा ॥ येणें एकें गुणें आकाशा । अंबरत्व ॥ ३ ॥ आपण तंव खपुष्प । परी फळ दे जगद्रूप ॥ शब्द मवीं तैं अमुप । कोण आहे ॥ ४ ॥ विधिनिषेधाचिया वाटा । दाविता हाचि दिवटा ॥ बंध-मोक्ष कळिकटा । शिष्ट हाचि ॥ ५ ॥**

---

शब्द ह्या शब्दांतील अक्षरे अत्यंत उपयुक्त तर आहेतच; पण आठवण करून देणारा म्हणूनहि 'शब्द' हा विख्यात आहे. ह्या अक्षरांना, व्यक्त नसलेल्या परमात्म्याला स्पष्ट करून दाखविणारें जसें आरसेंच म्हणूं नये काय? १. डोळ्यांनी पाहणारा आरशांत पाहील यांत कांहीं विशेष नाहीं; पण हा अध्यात्मशास्त्ररूप दर्पण असा विशिष्ट गुणवान् आहे कीं, त्यांत अंधसुद्धां पाहूं शकतात, ज्ञानी होतात. २. शब्द हा मूळ मायेच्या वंशांतला; रवीसारखा कुलदीप आहे. शब्दाच्या या एका गुणामुळेंच आभाळाला अंबर म्हणतात. ३. स्वतः आकाशाचें फूल असला तरी शब्द जगाची सिद्धि करवितो. शब्दानें मोजतां येत नाहीं असा कोणता पदार्थ आहे सांगा पाहूं? ४. ही शब्दरूपी मशाल विधिनिषेधाच्या वाटा दाखविते. एखाद्याला बंध आणि दुसऱ्या एखाद्याला मोक्ष अशा वेगवेगळ्या तऱ्हा सांगून दोघांत भांडण लावणारा हा शब्द मोठा शिष्टच दिसतो कीं! ५.

हाचि अविद्येचा आंगीं पडे। तैं नाथिले ऐसें रूढे ॥ न लाहिजे तीन कवडे। साचा वस्तु ॥ ६ ॥ शुद्धा शिवाच्या शरीरीं। कुमारु हा जीउ भरी ॥ जेवि आंगे पंचाक्षरी। तेविंचि बोलु ॥ ७ ॥ जीव देहे बांधिला। तो बोलें एकें सुटला ॥ आत्मा बोलें भेटला। आपणपया ॥ ८ ॥ दिवसातें उगो गेला। तंव रात्रीचा द्रोहो आला ॥ म्हणोनि सूर्यो या बोला। उपमा नव्होचि ॥ ९ ॥ जे प्रवृत्ति आणि निवृत्ति। विरुद्धा इया हातु धरिती ॥ मग शब्देंचि चालती। एकलानि ॥ १० ॥ सहाय आत्मविद्येचें। करावया आपण वेचे ॥ गोमटे काय शब्दाचें। एकैक वानूं ॥११॥ किंबहुना शब्दु। स्मरणदानीं प्रसिध्दु। परी ययाही समंधु। नाहीं येथें ॥ १२ ॥

---

अविद्येची बाजू घेऊन शब्द हा हें खोटें दिसणारें जग खरें आहे असें दाखवितो तेव्हां सद्रूप परमात्म्याला तीन कवडीहि किंमत उरत नाहीं. ६. ज्याप्रमाणें पंचाक्षरी हा अक्षता फेकून पिशाच्चाला बोलावितो, नेमका तसाच हा शब्द 'जीवेश्वर भाव' उमटवितो. ७. शुद्ध परमात्मारूप जीव हा देहाच्या सान्निध्यानें बद्ध झाला असला तरी तो श्रुतिशब्दरूप महा-वाक्यानें देहसंबंधांतून अलग होतो. मग आपलें आपल्यालाच शुद्ध परमात्मस्वरूप भेटतें तेंहि शब्दानेंच ८. सूर्य दिवसाचा उदय करावयास गेला असता रात्रीचा मात्र नाश करतो, म्हणून सूर्याची उपमा शब्दाला देणें बरोबर नाहीं. ९. पण प्रवृत्ति आणि निवृत्ति ह्या एकमेकींविरुद्ध असणाऱ्या दोघींना एकमेकींचे हात धरून शब्द मात्र चालवितो. १०. शब्दांचा चांगुलपणा किती सांगावा ! हा आत्मविद्येची प्राप्ति करून देण्यांत स्वतःचा नाश करून घेतो. ११. अधिक काय बोलावें ? स्मरण करून देण्यांत शब्द प्रसिद्ध आहे हें खरे, पण ब्रह्माच्या ठिकाणी स्मरणाचा संबंध येतोच कोठें ? १२.

आत्मया बोलाचें । कांहींच उपयोगा न वचे ॥ स्वसंवेद्या कोण्हाचें । ओझें आथी ॥ १३ ॥ आठवे कां विसरे । विषो होऊनि अवतरे ॥ तरी वस्तूशीं वस्तु दुसरे । असेना कीं ॥१४॥ आपण आपणयातें । आठवी विसरे केउतें ॥ काय जिभ जिभेतें । चाखे न चाखे ॥ १५ ॥ जागणेया नीद नाहीं । मा जागणें घडे काई । स्मरणास्मरण दोन्हीही । स्वरूपीं तैशीं ॥ १६ ॥ सूर्यो रात्री पां नेणें । मा दिवो काय जाणें । तेवी स्मरणास्मरणें । आपण वस्तु ॥ १७ ॥ एवं स्मरणास्मरण नाहीं । तरी स्मारकें काज काई ॥ म्हणोनि इये ठाईं । बोलू न सरे ॥ १८ ॥

---

आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं शब्दांचा उपयोग कांहींच नाहीं. स्वसंवेद्य परमात्म्याला कोणाची मदत लागत नाहीं. १३. स्मरण होवो, विस्मरण होवो, अथवा विषयांचे रूपाने प्रकट होवो, तरी पण एक वस्तूच, दुसरें कांहीं नाहीं. १४. स्वतःचें स्वतःला स्मरण किंवा विस्मरण कसे संभवणार ? जीभ स्वतःला चाखते किंवा चाखत नाहीं हें म्हणणें योग्य आहे का ? १५. जागणाऱ्याला झोंप तर नाही, मग 'मी जागा आहे' असे म्हणणें त्याच्या ठिकाणीं संभवेल का ? अर्थात् नाहीं. त्याप्रमाणें स्वरूपाच्या ठिकाणीं स्मरण विस्मरण हीं दोन्हीं नाहींत. १६. सूर्याला रात्र ठाऊकच नाहीं, मग त्याला दिवस तरी ठाऊक आहे ? त्याप्रमाणें परमात्मवस्तु, स्मरण आणि विस्मरण या दोघांनाहि जाणवत नाहीं. १७. परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं जर स्मरण वा विस्मरणांचा संबंध नाहीं; तर मग स्मरण करून देणारा जो शब्द त्याचेंहि कारण नाहीं, म्हणून परमात्मवस्तूच्या ठिकाणीं शब्दानें काम भागत नाहीं, तिचा लाभ होत नाहीं. १८.

आणिक एक शब्दें । काज कीरू भले सिद्धे ॥ परी धिवसा न बंधे । विचारु येथें ॥ १९ ॥ कां जे बोले अविद्या नाशे । मग आत्मेन आत्मा भासे ॥ म्हणत खेव पिसें । आलेंच कीं ॥ २० ॥ सूर्यों रात्री मारील । मा आपणया उदो करील । हे कुडे सरती बोल । साचाच्या गांवीं ॥ २१ ॥ निदेलें निदे रुसे । ऐसें कीं नीद असे ॥ कीं चेइलें चेऊं बैसे । ऐसे चेणें आहे ॥ २२ ॥ म्हणौनि नाशा पुरती । अविद्या नाहीं निरुती । नाही आत्मा आत्मस्थितीं । रिगे ऐसा ॥ २३ ॥ अविद्या तंव स्वरूपें । वांझेचें कीर जाउपे । ना तर्काचें खुरपें । खांडणें कोणा ॥ २४ ॥ इंद्रधनुष्या सिते । कवण घनवई न घालिजेते ॥ तें दिसे तैसें होतें । साच जरी ॥ २५ ॥

---

शब्दानें आणखी एक चांगले काम केलें जातें हें खरें; पण हा विचार करण्याचा धीर होत नाहीं. १९. कारण शब्द अविद्येचा नाश करितो, मग आत्मा आत्म्याला भासमान होतो, असें म्हणणें वेडगळपणाचें ठरतें. २०. सूर्य प्रथम रात्रीचा नाश करील आणि मग आपला उदय करील; हें बिनबुडाचे बोलणें विचाराच्या गांवांत टिकणारें नाहीं. २१. जागा झाल्यावर निद्रेची भीति वाटेल अशी कोठें निद्रा असते? नेहमीं जागा आहे तो 'जागा झाला' असें जागणें कोठें आहे कां? २२. म्हणून शब्दानें नाश करण्यापुरती खरोखर अविद्या तर नाहींत, आणि शब्दसाहाय्यानें आत्मस्थितींत आत्मा प्रवेश करील असा आत्माहि नाहीं. २३. खरोखर अविद्या तर स्वरूपानें वांझेचें पोर आहे. अभावरूप आहे. मग शब्दरूपी खुरपें कोणाचा नाश करणार हो? २४. दिसतें तसें इंद्रधनुष्य जर खरें असतें, तर एखाद्या धनुष्य धारण करणाऱ्यानें त्याला प्रत्यंचा चढविला नसतां काय? २५.

अगस्तीचिया कौतुका । पुरती जरी मृगतृष्णिका ॥ तरी मार देतो तर्का । अविद्येशीं ॥ २६ ॥ साहे बोलाची वळघी । ऐशी अविद्या असे जगीं ॥ तरी जाळूना कां आगीं । गंधर्वनगरें ॥ २७ ॥ नातरी दीपाचिये सोये । अंधारें कीर न साहे ॥ तेथें कांहीं आहे । जावयाजोगें ॥२८॥ नातरी पाहावया दिवसु । वातीचा कीजे सोसु ॥ तेव्हढाही उद्वसु । उद्वसु पडे ॥ २९ ॥ जेथें साउली न पडे । तेथें नाहीं जेणें पाडें ॥ मा पडे तेथें तेव्हडें । नाहींच कीं ॥ ३० ॥ दिसतचि स्वप्न लटिकें । हें जागरी होय ठाउकें ॥ तेविं अविद्याकाळीं सतुके । अविद्या नाहीं ॥ ३१ ॥ वोडंबरीच्या लेणिया । घरभरी आतुडलिया ॥ नागवे नागविलिया । विशेषु काई ॥ ३२ ॥ मनोरथाचें परिमळ । अरोगिजतु कां लक्षवेळ । परी उपवासा वेगळ । आनु आथी ॥ ३३ ॥

मृगजळ अगस्तीच्या घोटाला पुरलें असतें, तर शब्दानें अविद्येचा नाश झाला असता. २६. शब्दाची चढाई सहन करणारी अविद्या जगांत असती तर, खऱ्या अग्नीनें गंधर्वनगरें का जाळूं नयेत? २७. दिव्यापुढें अंधार येणें शक्य नाहीं असें जर आहे; तर मग दिव्याच्या प्रकाशानें नाहीसे होण्यासारखें काहीं आहे का? २८. अथवा सूर्य पाहण्यासाठी वाती लावण्याची खटपट करणें जसा व्यर्थ शिण होय; त्याप्रमाणें शब्दानें अविद्येचा नाश होतो हें म्हणणें अडाणीपणाचें आहे. २९. जेथें सावली पडत नाहीं तेथें जितक्या प्रमाणांत ती नाहीं, तितक्याच प्रमाणात जेथें सावली पडतें, तेथेंहि ती नसणारच कीं! ३०. झोंपेंत दिसणारें स्वप्न दिसत असतांहि तें खोटें आहे, हें जागें झाल्यावर समजतें; त्याचप्रमाणें अविद्याकालींहि अविद्या मुळींच नाहीं. ३१. गारुड्यानें खेळांत दाखविलेलें दागिने तिजोरींत भरून ठेविले, अगर एखाद्या नागव्या माणसास लुटलें तर त्यानें विशेष काय साधणार? ३२. कल्पनेंतील पक्वान्नें लाखो वेळ खाल्ली तरी उपाशी राहण्याशिवाय दुसरें कांहीं फल मिळणार नाहीं. ३३.

मृगजळ जेथ नमुंडे । तेथ असे पां कोरडे । मा उमंडे तेथ जोडे । वोल्हासु काई ॥ ३४ ॥ हें दिसे तैसें असे । तरी चित्रींचेनि पाउसें ॥ वोल्हावतु कां माणुसें । आगरा तळीं ॥ ३५ ॥ कालवूनि अंधारें । लिहो येती अक्षरें ॥ तरी मशी-चिये वोरबारे । कां शिणावें ॥ ३६ ॥ आकाश काय निळें । न देखतु हे डोळे ॥ तेवी अविद्येचे टवाळे । जाणोनि घेईं ॥ ३७ ॥ अविद्या येणें नांवें । मी विद्यमानाचि नव्हे ॥ हे अविद्याचि स्वभावें । सांगतसे ॥३८॥ आणि इये अनिर्वाच्यपण । ते दुजेही देवांगण ॥ आपुलां अभावीं आपण । साधितसे ॥३९॥ कांहींच जरी आहे । तरी निर्धारु कां न साहे ॥ वरी घटाभावीं भोये । अंकित दिसे ॥ ४० ॥

ज्या जागीं मृगजळ दिसत नाहीं, ती कोरडी असते. पण जेथें तें दिसते त्या जागीं तरी कांहीं ओलावा असतो काय? ३४. प्रत्यक्ष दिसणारें जग जसें दिसतें, तसेंच अविद्याकार्य यथार्थ असतें, तर चित्रांत काढलेल्या पावसानें माणसें, भाताची आगरें व तळींहि भिजून नसती का गेली? ३५. अंधार जसा दिसतो तसाच जर तो खरोखर काळा पदार्थ असता, तर तो पाण्यांत कालवून लिहितां आलें असतें व मग शाईकरितां काजळ मिळविण्याची उठाठेव तरी कोणी कशाला केली असती? ३६. मुळींच रंग नसणारे आकाश जसें डोळ्यांना निळें दिसतें, त्याप्रमाणें हें अविद्याकार्य जगत् नसूनहि दिसतें; म्हणून तें मिथ्या समजावें. ३७. 'अविद्या' या नांवानें मी विद्यमानच असें अविद्या स्वतःच सांगते. ३८. आणि अविद्येनें आपल्या अनिर्वाच्यपणाची शपथ घेऊन आपलें नसलेंपण आपल्या नांवावरून सिद्ध करून दिलें. ३९. कारण ही अविद्या आहे असें म्हणावें तर ती विचारांपुढें कां टिकत नाही? घटाभावानें जमीन कोठें घटाभास-युक्त दिसते काय? ४०.

अविद्या नाशी आत्मा। ऐशी नव्हे प्रभा। सूर्या आंगीं तमा। जयापरी ॥ ४१ ॥ हे अविद्या तरी मायावी। परी मायावीपणचि लपवी ॥ हे साचा आली अभावी। आपुलां हे ॥ ४२ ॥ बहुता-परी ऐशी। अविद्या नाहीं आपैशी ॥ आतां बोलू हात वसी। कवणावरी ॥ ४३ ॥ साउलि येते साबळे। हालया भोय आडळे ॥ कीं हालेन अंतराळें। थोटावे हातु ॥ ४४ ॥ कां मृगजळाच्या पानीं। गगनाच्या आलिंगनी ॥ नातरी चुंबुनीं। प्रतिबिंबाच्या ॥ ४५ ॥ उठावला बोथरे तवका। तो सुनाथा पडे आसिका ॥ अविद्यानाशीं तर्का। तैसें होये ॥ ४६ ॥ ऐशी अविद्या नासावी। हें वाहेल जो जीवीं ॥ त्यानें साली काढावी। आकाशाची ॥ ४७ ॥

---

ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करणें हें सूर्याची प्राप्ति करून घेणें नाही; त्याप्रमाणें अविद्येचा नाश झाल्यावर आत्म्याची प्राप्ति होईल असें बुद्धीस वाटत नाहीं. ४१. अविद्या ही मायावी असून ती आपला मायावी-पणाच लपविते असें म्हणणें असेल, तर या म्हणण्यानेंच तिचा अभाव सिद्ध झाला. ४२. निरनिराळ्या बाजूंनीं विचार केला तरी अविद्या नाहीं, असें सहजच ठरतें; मग शब्दाने कोणावर हात उचलावयाचा? ४३. पहारीनें सावलीस मारावयास गेलें तर जमिनीलाच खळगी पडेल; अगर हातानें आभाळाला चापटी दिली तर हातच उखडेल! ४४. किंवा मृग-जळ प्यावें, आकाशाला मिठी मारावी, अथवा प्रतिबिंबाचें चुंबन घ्यावें, ४५. अशी मनांतली प्रबळ इच्छा कमी होऊन पूर्णपणें व्यर्थ होते. शब्दाची स्थिति अविद्येचा नाश करण्याचे कामीं व सांगितल्याप्रमाणें होते. ४६. अशा अभावरूपानें असलेल्या अविद्येचा नाश करावा असें ज्याच्या मनांत येईल त्यानें आकाशाची साल काढावी. ४७.

तेणें शेळी गळां दोहावी । गुडगाडोळां वास पहावी ।। वाळवूनि काचरी करावी । सांजवेळेची ।। ४८ ।। जांभई वाटूनि रसु । तेणें काढावा बहुवसु ।। कालवूनि अळसु । मोदळा पाजावा ।। ४९ ।। तो पाटा पाणी परतु । पडली साउली उलथु ।। वारयाचे ताथू । वळूं सुखें ।। ५० ।। तो बागुलातें मारूं । प्रतिबिंब खोळे भरूं ।। तळहातींचे विंचरू । केश सुखे ।। ५१ ।। घटाचे नाहींपण फोडूं । गगनाचीं फुलें तोडूं ।। सशियाचे मोडूं । शिंग सुखें ।। ५२ ।। तो कापुराची मशी करु । रत्नदीपीं काजळ धरु ।। वांझेचें लेंकरुं ।। परणू सुखें ।। ५३ ।। तो अवसेचिनि सुधाकरें । पोखू पाताळींचीं चकोरें ।। मृगजळींची जळचरें । गाळूं सुखें ।। ५४ ।। अहो हें किती बोलावें । अविद्या रचिली अभावें ।। आतां काय नासावें । शब्दें येणें ।। ५५ ।।

---

शेळीच्या गळ्यांतील स्तनाचें दूध काढावें, गुडघ्यांच्या डोळ्यांनीं मार्ग पाहावा, सांजवेळ वाळवून तिची काचरी करावी; ४८. जांभई वाटून रस कढावा व त्यांत आळस कालवावा, तो चिखलाच्या गोळ्यास पाजावा; ४९. त्यानें पाण्यासुद्धां पाट उलथावा; पाटाचें पाणीं उलट दिशेला न्यावें; सावली उलथवावी; वाऱ्याचे धागे वळावे; ५०. त्यानें बागुलबोवाला मारावें; प्रतिबिंब वस्त्रांत घ्यावें, तळहातावरचें केस हवें तितकें विंचरावे ! ५१. नसलेलें गाडगें फोडावें, आकाशाची फुले तोडावीं; सशाचें शिंग सुखानें मोडावें; ५२. त्यानें कापूर जाळून त्याची शाई करावी, रत्नाच्या दिव्यावर काजळ धरावें, वांझेच्या मुलीशीं लग्न करावें. ५३. अमावास्येचें चंद्रामृत पाताळांतील चकोरांना घालून ते वाढवावेत, मृगजळांतील प्राणी पकडावे. ५४. खरोखर ह्या सर्व गोष्टी ज्याप्रमाणें असंभवनीय आहेत, त्याप्रमाणें नाहींपणानें असणाऱ्या अविद्येचा शब्दानें नाश असंभवनीय होय. ५५.

नाहीं तयाचेनि नासे । शब्द नये प्रमाणदशे ।। आंधारीं अंधारा जैसें । नव्हे रूप ।। ५६ ।। अविद्येची नाहीं जाती । तेथें नाहीं म्हणतया युक्ति ।। जेंवीं दुपारी कां वाती । अंगणीचिया ।। ५७ ।। न पेरितां शेतीं । जे कीं संवगणिया जाती ।। तया लाजापरौती । जोडी आहे ।। ५८ ।। खवाणियाच्या आंगा । जेणें केला वळघा ।। तो न करितांचि उगा । घरीं होता ।। ५९ ।। पाणियावरी वरखु । होतां कें असे विशेखु ।। अविद्यानाशीं उन्मेखु । फाकावा तैसा ।।६०।। माप मापपण श्लाघे । जंव आकाश मऊं नरिघे ।। तम पाहतां वाउगें । दीपाचे जन्म ।। ६१ ।। गगनाची रससोये । जीभ जैं अरोगूं जाये ।। मग रसना हें होयें । आडनांव कीं ।। ६२ ।। नव्हतेन वल्लभें । आहेवपण कां शोभे ।। खातां केळीचे गाभे । न खातां गेलें ।। ६३ ।।

---

शब्द हा नसणाऱ्या अविद्येच्या नाशानें प्रमाणदशेला येत नाहीं. अंधारांत अंधार वेगळा नसतो. ५६. अंगणांत दोन प्रहरीं दिवा नेऊन ठेविला तर त्याचा उपयोग काय ? अविद्येलाच जर स्वरूपस्थिति नाहीं, तर तेथें युक्तीचा उपयोग काय ? ५७. धान्य न पेरतां जे शेतकाढणीला जातात, त्यांना लाजेशिवाय दुसरें मिळणार काय ? ५८. आकाशाच्या अंगावर हल्ला करणारा स्वस्थ घरांत होता असेंच म्हटलें पाहिजे. ५९. समुद्रावर वर्षाव झाला तर त्यांत काय झालें ? त्याप्रमाणें अविद्येचा नाश करण्यांत शब्दाचा प्रयत्न व्यर्थ आहे. ६०. आकाशाचें माप घेतलें जात नाहीं तोंपर्यंतच मापाला मापपणाची शोभा. दिव्यानें अंधकार पाहिला तर त्याचा जन्म व्यर्थ होय ! ६१. आकाशाच्या पक्वान्नाची जीभ जर चव घेईल, तर तिचें रसना म्हणजे चव घेणारी हें नांव व्यर्थ होईल. ६२. जिचा पती जिवंत नाहीं त्या स्त्रीला ' सुवासिनी ' असें म्हणणें शोभेल काय ? किंवा केळीचा गाभा कोणी भक्षण करूं म्हणेल तर तें भक्षण करणें न भक्षण करणेंच होय. ६३.

**स्थूल सूक्ष्म कवणयेकु । पदार्थ न प्रकाशी अर्कु ।। परी रात्रीविषयीं अप्रयोजिकु । जालाचि कीं ।। ६४ ।। दिठी पाहतां काय न फवे । परी निदेतें तंव न देखवे ।। चेतातें न संभवे । म्हणूनियां ।। ६५ ।। चकोराचिया उद्यमा । लटिकेपणाची सीमा ।। जरी दिहाची चंद्रमा । गिंवसुं बैसें ।। ६६ ।। नुसधीयेचि साच्या । मुका होय वाचरुकाचा ।। अंतराळीं पायाचा । पंधा होय ।। ६७ ।। तैशी अविद्येसीं सन्मुखे । सिद्धाचि प्रतिसेदके ।। उठलींचि निरर्थकें । जल्पें होतीं ।।६८।। अवसे आला सुधाकरु । न करीचि काई अंधःकारु ।। अविद्यानाशी विचारु । तैसा होये ।। ६९ ।। नाना न निफजतेन अन्नें । जेवणें तोचि लंघनें ।। निमालेन नयनें । पाहणाचि अंधु ।। ७० ।।**

---

सूर्य स्थूल किंवा सूक्ष्म असा कोणता पदार्थ प्रकाशित करीत नाहीं. परंतु तोच सूर्य रात्रीचा प्रकाश करण्यांत निरुपयोगीच ठरणार. ६४. दृष्टि इतर सर्व पाहते पण ती झोपेला पाहायला दुबळी आहे; कारण जागा असलेला 'झोंपला आहे' हें म्हणणें संभवतच नाहीं. ६५. दिवसा चंद्रामृतपान करण्याच्या इच्छेनें चकोर चंद्राला शोधीत बसेल तर फुकट आहे. ६६. 'कोरा कागद वाच' असें सांगितलें तर वाचणारा मुका होतो, कसलाहि चालणारा आकाशांत चालताना पांगळा होतो. ६७. त्याप्रमाणें स्वाभाविक अभावरूप असणाऱ्या अविद्येच्या समोर, तिचा नाश करणारा शब्द उठला तरी तो निरर्थकच होतो. ६८. अंवसेच्या रात्री चंद्र उदयास आलाच तर तो प्रकाश देईल म्हणून ती अंवस नव्हेच. त्याप्रमाणें अविद्येच्या अनाशाविषयी शब्दाची स्थिति होय. ६९. किंवा तयार न केलेल्या अन्नाचें जें जेवण तेंच लंघन; फुटलेल्या डोळ्यांनीं पाहणारा तोच आंधळा. ७०.

**कैसेन ही वस्तु नसे। तेथें जैं शब्दाचा अर्थ हों बैसे ॥ तैं निरर्थकपणें नाशे। शब्दही थिता ॥ ७१ ॥ आतां अविद्याचि नाहीं। हें कीर म्हणों काई ॥ परी नाशितां कांहीं। नुरोचि शब्दाचें ॥ ७२ ॥ यालागीं अविद्येचिया मोहरा। उठिलियाही विचारा ॥ आंगाचाचि संसारा। होऊनि ठेला ॥ ७३ ॥ म्हणोनी अविद्येचेनि मरणें। प्रमाणा येईल बोलणें ॥ हे अविद्याचि नाहीं-पणें। नेदी घडों ॥ ७४ ॥ आणि आत्मा हन आत्मया। दाऊनि बोलू महिमया ॥ येईल हे साविया। विरुद्धाचि ॥ ७५ ॥ आपणया आपणपेंशी। लागलें लग्न कवणें दिवशीं ॥ कीं सूर्य आंग ग्रासी ऐसें ग्रहण आहे ॥ ७६ ॥ गगन आपणया निघे। सिंधू आपणपा रिघे ॥ कीं तळतात काय वळंघे। आपणपया ॥ ७७ ॥**

---

कोणत्याहि रूपानें नसणाऱ्या पदार्थांची सिद्धि करण्याविषयीं शब्द प्रयत्न करू लागला तर तो प्रयत्न निरर्थक होऊन शब्द आपले अस्तित्व मात्र नाहींसें करून घेतो. ७१. आतां अविद्याच नाहीं, असें कसे म्हणावें ? पण तिचा नाश करू जातां शब्दच उरत नाहीं. ७२. म्हणजेच अविद्येचा नाश करण्यासाठी विचार म्हणजे शब्द तिच्यासमोर उभा राहील तर तो स्वतःनाश पावेल. ७३. म्हणून अविद्येच्या नाशानें शब्दाला प्रामाण्य येईल ही गोष्ट, अविद्याच आपल्या नाहींपणानें घडूं देत नाहीं. ७४. आणि आत्म्याला आत्मा दाखवून शब्द प्रतिष्ठेला येईल, हें म्हणणेंच खरोखर उलट आहे. ७५. आपलें आपल्याशींच लग्न लागलें असें कुठें तरी ऐकलें आहे कां ? किंवा सूर्य आपलें बिंब आपणच ग्रासतो असें कुठे तरी ऐकलें आहे का ? ७६. स्वतःकडे जाण्यासाठीं आकाश निघूं शकेल काय ? किंवा स्नानाकरितां समुद्र आपल्या पोटांत शिरेल तरी कसा ? अगर तळहात तळहातावरच चढेल काय ? ७७.

**सूर्य सूर्यासी विवळे । फळ आपणया फळे ।। कीं परिमळु परिमळे । घेपतसे ।। ७८ ।। चराचरा पाणीपाजणी । करूं येईल एके क्षणीं ।। परी पाणियासी पाणी । पाजों ये काई ।। ७९ ।। साठीतिसा दिवसा । माजी एकादा होय ऐसा ।। जे सूर्यासी सूर्य जैसा । डोळा दावी ।। ८० ।। कृतांत जरी कापेल । तरी त्रैलोक्य हें जाळील ।। वांचूनि आगी लावील । आगीसी काई ।। ८१ ।। आपणपे आपणया । दर्पणेंवीण धात्रया ।। समोर होआवया । ठाकी आहे ।।८२।। दिठी दिठीतें रिघों पाहे । रुचि रुचीतें चाखूं सूये ।। कीं चेतया चेवऊं ये । हें नाहींच कीं ।। ८३ ।। चंदन चंदनपणा लावी । रंग रंगपणा रावी ।। मोती-पण मोती लेववी । ऐसें कैसें ।। ८४ ।।**

---

सूर्य सूर्यालाच उदय करील? फळ आपला उपयोग आपणच घेते काय? गंधाला आपलाच वास घेतां येईल काय? ७८. सर्व चराचराला एकाच क्षणांत पाणी पाजण्याचें मनांत आणलें तर तें शक्य आहे; पण पाण्याला कसें पाणी पाजतां येईल? ७९. तीनशें साठ दिवसांत एखाद्या दिवशीं तरी सूर्य आपल्या डोळ्यांनीं आपल्यास पाहील काय? ८०. प्रलयकालचा अग्नि कोपानें त्रैलोक्य जाळून टाकील, पण त्याला स्वतःला पेटवून घेतां येईल काय? ८१. ब्रह्मदेवाला तरी आरशावांचून आपल्या-समोर आपलें रूप पाहण्याची काय सोय आहे? ८२. दृष्टि दृष्टीला कशी पाहील? रुचि आपली रुचि घेईल काय? किंवा जाग्यास जागें करतां येईल काय? हें नाहींच. ८३. चंदन आपली उटी आपल्यास लावील, रंग आपल्यालाच रंगवील किंवा मोतीं आपलीच प्रभा आपल्याच अंगावर घालील हें कधीं घडेल काय? ८४.

सोनेंपण सोनें कसी । दीपपण दीप प्रकाशी ॥ रसपण बुडी दे रसीं । तें के जोडे ॥ ८५ ॥ आपुले मुकुटीं समर्थां । चंद्र बैसाविला सर्वथा । परी चंद्र चंद्राचिये माथा । वाऊं ये काई ॥ ८६ ॥ तैसा आत्मराज तंव । ज्ञानमात्रचि भरीव ॥ आतां ज्ञाने ज्ञानासी खेव । कैसें दीजे ॥ ८७ ॥ आपुलेनि जाणपणें । आपणयातें जाणों नेणें ॥ डोळ्या आपुले पाहणें । दुवाड जैसें ॥ ८८ ॥ आरसा आपुलिये । आंगीं आपणा पाहे ॥ तैं जाणणें जाणों लाहे । आपणयातें ॥ ८९ ॥ दिगंता पैलीकडेचें । धांवोनि सुर्या खोचे ॥ मा तिये कां तियेचें । आंग फुटे ॥९०॥ रसवृत्तीसी उगाणें । घेऊनि जिव्हाग्र शहाणें ॥ परी काई कीजे नेणें । आपणपें चाखों ॥ ९१ ॥

---

सोनेंच सोन्याचा कस लावील, दिवाच दिव्याला प्रकाश करील, रसच रसांत बुडी देईल, हें कसें घडेल ? ८५. समर्थ भगवान् शंकरांनीं आपल्या डोक्यावर चंद्र बसविला, पण चंद्राला आपल्याच डोक्यावर बसतां येणें शक्य आहे काय ? ८६. ज्याप्रमाणें कधींच ह्या गोष्टी घडणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें आत्मा तर भरीव ज्ञान आहे, तेव्हां आतां त्या ज्ञानाला शब्द-रूपी ज्ञानानें आलिंगन कसें द्यावें ? ८७. आपणा स्वतःला पाहातां येत नाहीं. ८८. आरसा आपल्याच ठिकाणीं आपलें स्वरूप पाहूं शकेल, तरच ज्ञान आपल्यास ज्ञेय करून जाणूं शकेल. ८९. सुरी धांवत जाऊन आकाशापलीकडच्या पदार्थालाहि मारूं शकेल, पण ती स्वतःला मारून घेईल का ? ९० सर्व रसांची चव घेण्यांत जीभ कुशल असली तरी आश्चर्य हें कीं, ती स्वतःला चाखूं शकत नाहीं. ९१.

**तरी जिभे काय आपुलें । चाखणें हन ठेलें ।। तैसें नव्हे संचलें । तेंचि तें कीं ।। ९२ ।। तैसा आत्मा सच्चिदानंदु । आपणया आपण सिध्दु ।। आतां काय दे शब्दु । तयाचें तया ।। ९३ ।। कोणाही प्रमाणाचेन हाते । वस्तु घे ना नेघे आपण-यातें ।। जें स्वयें आइते । घेणें ना नघेणें ।।९४।। म्हणोनी आत्मा आत्मलाभे । नांदवुनि शब्द शोभे ।। येईल ऐसा न लभे । उमसु घेवो ।। ९५ ।। एवं माध्यान्हीची दिवा । तम धाडी ना दिवो दावी ।। तैशी उभयतां पदवी । शब्दा जाली ।। ९६ ।। आतां अविद्या नाहींपणें । नाहीं तये नासणें ।। आत्मा सिध्दुचि मा कोणें । काय साधावें ।। ९७ ।।**

---

असें जरी आहे तरी जिभेचे चाखणें नाहींसें झाले असें म्हणावें तर तसें नाहीं. किंतु जिव्हाग्र चाखणेंपणानेंच भरले आहे. ९२. त्याचप्रमाणें आत्मा सच्चिदानंदज्ञानरूप आपल्या ठिकाणीं आपण सहजच सिद्ध आहे. आतां अशा स्वतःसिद्ध प्रकाशरूप आत्म्याला तो शब्द आपल्या पदरचें नवीन ज्ञान काय देणार? ९३. (प्रत्यक्षादि) प्रमाणाच्या साहाय्यानें परमात्मा स्वतःचें अस्तित्व सिद्ध करीत नाहीं किंवा होऊं देत नाहीं; कारण अनादिसिद्धच आहे. सिद्धि वा असिद्धि हा शब्द वस्तुस्वरूपाच्या ठिकाणीं कुचकामी आहे. ९४. म्हणून आत्म्याला सच्चिदानंद स्वरूपाची प्राप्ति करून देऊन शब्दाला शोभा येईल असें मुळींच नाहीं. ९५. एवंच ज्याप्रमाणें मध्यान्हकालीं सूर्यप्रकाशांत ठेविलेला दिवा अंधार घालवूं शकत नाहीं व दिवसही दाखवू शकत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूप प्रकाशित किंवा अज्ञान निवृत्त करण्याविषयीं पात्रता नसल्यामुळें शब्दाला तीच दशा प्राप्त होते. ९६. आतां अविद्या मुळींच नाहीं म्हणून तिचा नाश संभवत नाहीं. आणि आत्मा स्वतःसिद्ध असल्यामुळें शब्दानें त्याची सिद्धि होत नाहीं, अशा स्थितींत कोणीं काय साधावें? ९७.

ऐसा उभयपक्षीं । बोला न लाहोनि नखी ।। हारपला प्रळयो-दकीं । वोघू तैसा ।। ९८ ।। आतां बोला भागू कांहीं । असणें जयाच्या ठाईं ।। अर्थता तरी नाहीं । निपटूनियां ।। ९९ ।। बागूल आला म्हणते । बोलणें जैसे रितें ।। कां आकाश वोळंबतें । तळहातीं ।। १०० ।। तैसीं निरर्थकें जल्पे । होऊनियां सपडपें ।। शोभती जैशी लेपें । रंगावरी ।। १०१ ।। एवं शब्दैकजीवनें । बापुडीं ज्ञानें अज्ञानें ।। साचपणें वनें । चित्रींचीं जैशीं ।।१०२।। या शब्दाचा निमाला । महाप्रळयो हो सरला ।। अभ्रासवें गेला । दुर्दिनु जैसा ।। १०३ ।।

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते शब्दखंडनं नाम षष्ठप्रकरणं संपूर्णम् ॥**

---

दोन्ही बाजूंनीं नखाइतकाहि शब्दाचा प्रवेश न होता प्रलयजळांत ओघ नाहींसा होतो, शब्दहि नाहींसा होतो. ९८. विचार केला कीं शब्दाचा आत्मस्वरूपाशीं कसलाहि संबंध नाहीं, हें लक्षांत येतें. ९९. बागुलबोवा आला, आभाळ हातांत पकडलें हें बोलणें निरर्थक १००. रंगांतील चित्रें जितकीं निर्बल तितकाच आपल्या सर्व बडिवारासह शब्द आत्म्याला सिद्ध करण्यास दुबळा ठरतो. १०१ केवळ शब्दाच्या सामर्थ्यानें जगणारीं ज्ञानें आणि अज्ञानेंहि चित्रांत रंगविलेल्या उपवनाप्रमाणें खरीं भासतात. १०२. ढगाळ हवा नाहींशीं झाली कीं दुष्काळ पडण्याचें संकट नाहींसें होतें. त्याचप्रमाणें येथें शब्द अकार्यक्षम होतो म्हणून त्यावर आधारलेली व परमात्मस्वरूप स्पष्ट करूं इच्छिणारीं ज्ञानें आणि अज्ञानेंहि अशीं निरर्थक ठरतात. ।।१०३।।

**प्रकरण सहावें समाप्त**

# प्रकरण सातवें

**येन्हवीं तऱ्ही अज्ञाना । जें ज्ञानाची नसे क्षोभना ।। तै तरी काना-। खालींच दडे ।। १ ।। आडसूनि अंधारी । खद्योत दीप्ती सिरी । तैसें लटिकेवरी । अनादी होये ।। २ ।। जैशी स्वप्ना स्वप्नीं महिमा । तमीं मानुं असे तमा ।। तेवी अज्ञानगरिमा । अज्ञानींची ।। ३ ।। कोल्हेरीचे । आसिवारु न येता धारकी धरु ।। नये लेणा श्रृंगारु । वोडंबरीचे ।। ४ ।। हे जाणणयाच्या घरीं । खोंचिलेंही आन न करी ।। काई चांदिणां उठे लहरी । मृग-जळाची ।। ५ ।। आणि ज्ञान हें जें म्हणिजे । तें अज्ञानचि पा दुजें ।। एक लपवूनि दाविजे । एक नव्हे ।। ६ ।।**

---

तसें पाहिलें तर ज्ञानाचा टेका अज्ञानाला नसेल तर अज्ञान हा शब्द ऐकायलाहि मिळणार नाहीं. १. अंधाराचा आश्रय घेऊन काजवा आपलें तेज मिरवतो, तसें अज्ञान अभावाचा आश्रय घेऊन अनादिपणानें मिरवितें. २. स्वप्नाचें महत्त्व स्वप्नांतच; अथवा अंधकाराचें महत्त्व अंधकारांतच, त्याप्रमाणें अज्ञानाची थोरवी अज्ञानांतच. ३. कुंभारानें तयार केलेले मातीचे घोडे रंगणावर धरतां येत नाहींत. मंत्रानें केलेले दागिने अंगावर घाल-ण्याच्या उपयोगीं पडत नाहींत. ४. त्याप्रमाणें ज्ञानाच्या घरांत अज्ञानाला डिवचलें तरी तें भिन्नरूपानें प्रत्ययास येत नाहीं. ( अरे ! ) चांदण्यामुळें मृगजळाच्या लाटा तयार होतील का ? ५. व्यवहारांत जसें दोन समान पदार्थ असले म्हणजे एक लपवून दुसरा दाखवीत नाहींत का, तसें ज्याला ज्ञान म्हणतात तेंहि पण दुसरें अज्ञानच होय. ६.

**असो आता हा प्रस्तावो। आधीं अज्ञानाचा धांडोळा घेवों॥ मग तयाच्या साची लाहो। ज्ञानही लटिकें॥७॥ या अज्ञान ज्ञानातें। आंगेंचि आहे जितें॥ तरी जेथें असे तयातें। नेण कां न करी॥८॥ अज्ञानें जेथें असावें। तेणें सर्व नेण होआवें॥ ऐशी जाती स्वभावें। अज्ञानाची॥९॥ तरी शास्त्रमत्त ऐसें। जे आत्माच अज्ञान असे॥ आणि तेणें तो गिवसे। आश्रो जरी॥१०॥ तरी त्रुटिता दुजें। जैं अज्ञान असे बीजें॥ तैं तेंचि आथी हें बुझे। कोण येथें॥११॥ अज्ञान तंव आपणयातें। जडपणें नेणें निरुतें॥ आणि प्रमाण प्रमाणातें। होत आहे॥१२॥**

अज्ञानाप्रमाणेंच ज्ञान हें लटकें आहे हा ज्ञानखंडनाचा हा एक तत्त्व-विचार तूर्त बाजूला ठेवूं. या प्रकरणांत अज्ञानविषयक विचार करूं या. त्याच्या विचारांत तें लटकें ठरलें तर त्यावरून ज्ञानहि खोटें म्हणावयास कांहीं अडचण आहे काय? ७. ज्या परमात्म्याच्या ठिकाणीं तें अज्ञान आहे त्याच्या स्वरूपाचा तें लोप कां करीत नाहीं? ८. ज्या ठिकाणीं अज्ञान असतें तें ज्ञानाला झांकून टाकतें. तो तर अज्ञानाचा स्वभाव आहे. ९. त्या आत्म्यावर अज्ञानाचें आवरण असल्यानें आत्मा त्याचा आश्रित असून आच्छादित आहे असें शास्त्रमत आहे. १०. वेगळेपणा उत्पन्न न होतां त्याच्या ठिकाणीं अज्ञान हें बीजरूपानें आहे असें मानावें; तर मग तें तेथे आहे हें कोणाला समजणें शक्य आहे? ११. स्वतः आपण जड (अचेतन) असल्यानें अज्ञान हें त्याचें त्यास व इतरांसहि समजत नाहीं. अविश्वासार्ह अज्ञान प्रमाण म्हणून कसें मानतां येईल? १२.

**यालागीं जरी अज्ञान । करील आपुलें ज्ञान ॥ हें म्हणत खेव घववी मौन । विरोधाचि ॥ १३ ॥ आणि जाणती वस्तु येक । तें येणें अज्ञानें कीजे मूर्ख ॥ तैं अज्ञान हे लेख । कवण धरी ॥ १४ ॥ अहो आपणयाही पुरता । नेणू न करवे जाणता ॥ तयातें अज्ञान म्हणता । लाजिजे कीं ॥ १५ ॥ आभाळें भानु ग्रासे । तैं आभाळ कोणें प्रकाशे ॥सुषुप्ती सुषुप्ते या रुसे । तें तेंचि कोणा ॥ १६॥ तैसें अज्ञान असे जेथें । तेंच जरी अज्ञान आते ॥ तरी अज्ञान अज्ञानातें । नेणतां गेलें ॥ १७ ॥ नातरी अज्ञान एक घडे । हें जयास्तव निवडे ॥ तें अज्ञान नव्हे फुडें । कोण्हे काळीं ॥१८॥ पडळही आथी डोळां । आणि डोळा नव्हे आंधळा ॥ तरी आथी या पोकळा । बोलिया कीं ॥१९॥ इंधनाच्या आंगी । खवळलेन आगी ॥ तें न जळे तरी वाउगी । शक्तीच ते ॥२० ॥**

---

एवढ्यासाठीं अज्ञानानें स्वतः माहिती करून घ्यावी, असें म्हटल्यास विरोध येतो. त्यामुळें मौन स्वीकारावें लागतें. १३. परमात्मा ही जाणून घेण्याची वस्तु या अज्ञानानें मूढ केली, असें म्हटलें तर हें अज्ञानाचें ज्ञान तरी कोणाला झालें ? १४. आपल्यापुरता परमात्मा हा तरी ज्ञेय-अज्ञेय, अतीत आहे. तो अज्ञानी म्हणावयास लाजणार. १५. आभाळानें सूर्य ग्रासला म्हणावें तर मुळांत आभाळ दिसणार तें कोणामुळें ? झोंपी गेलेल्या इसमावर निद्रा रुसली म्हणावें तर मग त्या माणसास काय मिळालें ? १६. त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं अज्ञान असतें तो जर आज्ञेय झाला, तर मूळचें अज्ञान या झांकलेल्या अज्ञानामुळें न कळतांच गेलें असें होणार नाहीं का? १७. सिद्धांत असा कीं, ज्या ज्ञानानें अज्ञान निवटलें जातें, तें ज्ञान केव्हांही अज्ञान होणार नाहीं. १८. डोळ्यांवर पडळ आलें तरी डोळा आंधळा नाहीं, ‘ पडळ आलें ’ हें म्हणणें जसें पोकळ आहे. १९. ज्या अग्नींत लाकूड टाकलें त्यांत तें जळत नसेल तर अशा अग्नीला अग्नि असें म्हणताच येणार नाहीं. २०.

**आंधारु कोंडूनि घरीं । घरा पडसाई न करी ॥ तैं अंधारु इहीं अक्षरीं । न म्हणावा कीं ॥ २१ ॥ वोजावों नेदी जागणें । तिये निदेतें नीद कोण म्हणे ॥ दिवसा नाणी उणें । तैं रात्र कैंची ॥ २२ ॥ तैसें आत्मा अज्ञान आसिके । असता तो न मुके ॥ तैं अज्ञानशब्द लटिके । आलेंचि कीं ॥२३॥ येन्हवीं तरी आत्मया । माजीं अज्ञान असावया ॥ कारण म्हणतां न्याया । चुकी येईल कीं ॥ २४ ॥ अज्ञान तममेळणी । आत्मा प्रकाशाची खाणी ॥ आतां दोहीं मिळणी । एकी कैशी ॥ २५ ॥ स्वप्न आणि जागरु । आठवू आणि विसरु ॥ हे युग्मे एका हारीं । चालती जरी ॥ २६ ॥ शीता तापा एकवट । वाहे वस्तीची वाट ॥ कां तमें बांधिजे मोट । सूर्यरश्मींची ॥ २७ ॥ नाना राती आणि दीवो । येती एकेठायीं राहो । तैं आत्मा जीवें जीवो । अज्ञानाचेनि ॥ २८ ॥**

---

अंधार घरांत कोंडून भरलेला आहे, पण तो अंधकाराचें काम करीत नसेल तर त्याला अंधकार असें तरी कसें म्हणावें? २१. जागृतींतील 'ओ' देण्याचें काम थांबलेलें नाहीं, तर मग निद्रा आली असें म्हटल्यास अशा निद्रेला कोणी निद्रा म्हणेल का? किंवा दिवसाला उणेपणा न येतां रात्र आहे हें म्हणणें संभवत नाहीं. २२. आत्म्याच्या ठिकाणीं संपूर्ण अज्ञान असतांना आत्म्याचें ज्ञान तर कमी होत नाहीं, यावरून अज्ञान हा शब्दच लटका ठरतो. २३. आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञान आहे हें म्हणणें संयुक्तिक धरून नाहीं. २४. कारण अज्ञान तर घनीभूत अंधकार-रूप. आत्मा तर प्रकाशाची खाणच, मग हे दोघे एके ठिकाणीं कसे असतील? २५. असें पाहा, स्वप्न व जागृति, स्मरण व विस्मरण दोन्हीं जर एके ठिकाणीं राहूं शकतील; २६. थंडी व उष्णता एका ठिकाणीं असतील किंवा अंधकारानें सूर्यकिरणांची मोट बांधली असेल, २७. आणि जर रात्र आणि दिवस एकत्र राहतील; तर आत्मा अज्ञानाच्या जिवावर जगतो असें म्हणतां येईल. २८.

**हें असो मृत्यु आणि जिणें । हे शोभती काय मेहुणे ॥ तरी आत्मेन असणें । अज्ञानेंशी ॥ २९ ॥ अहो आत्मेन जे बाधे । तेंचि आत्मेनशीं नांदे ॥ ऐशीं कायशी विरुद्धें । बोलणीं इये ॥३०॥ अहो अंधारपणींची पैज । सांडूनि अंधार तेज । जाला तैं सहज । सूर्य निभ्रांतचि ॥ ३१ ॥ दलांकुडपणा सांडिलें । आणि आगीपण मांडिलें ॥ तैं तेंचि आगीं जालें । इंधन कीं ॥ ३२ ॥ कां गंगा पावत खेवो । आनपणाचा ठावो ॥ सांडी तैं गंगा हो । लाहे पाणी ॥ ३३ ॥ तैसें अज्ञान हें अज्ञान नोहे । तरी आत्मा असकें असों लाहे ॥ येऱ्हवीं अज्ञान होये । लागलेंचि ॥ ३४ ॥ आत्मे-नशी विरोधी । म्हणोनि नुरेचि इये संबंधीं ॥ वेगळे तरी सिद्धि । जायेचिना ॥ ३५ ॥ लवणाची मासोळी । जऱ्ही होय जिव्हाळी ॥ तरी जळीं ना वेगळी । न जिये जेवीं ॥ ३६ ॥**

---

हें असो; मृत्यु आणि जिवंतपणा हें जर मेहूण म्हणून मिरवेल तर, आत्मा आणि अज्ञान एके ठिकाणीं राहूं शकतील. २९. अहो ! जें अज्ञान आत्मज्ञानानें नष्ट होतें, तेंच अज्ञान आत्म्याचे ठिकाणीं नांदतें हें म्हणणें परस्पर विरुद्ध नाहीं का ? ३०. अंधारपणा टाकून अंधार तेज झाला, तर तो निःसंशय सूर्यच झाला ! ३१. लाकूडपणा टाकून लाकूड अग्निरूप झालें, तर तें अग्नि झालें. ३२. किंवा ओहोळ गंगेला मिळतांक्षणींच आपला ओहोळपणा टाकून गंगारूप होतो; ३३. त्याप्रमाणें अज्ञानाचा व आत्म्याचा संयोग होतांच अज्ञान आपला अज्ञानपणा टाकून संपूर्ण ज्ञानच होतें; परंतु संयोग होण्यापूर्वी अज्ञान अज्ञान स्वरूपानें शिल्लक असतेंच. ३४–३५. मिठाचा मासा करून त्यांत प्राण घातला तरी पाण्यामध्यें किंवा पाण्याच्या बाहेर तो जिवंत राहत नाहीं. ३६.

जे अज्ञान येथें नसे। तरीच आत्मा असे॥ म्हणोनी बोलणीं वायसें। नायकावीं कीं॥ ३७॥ दोरी सर्पाभास होये। तो तेणें दोरें बांधो ये॥ ना दवडणें न साहे। जयापरी॥ ३८॥ नाना पुनिवेचेनि आंधारें। दिहाभेण राती महुरे॥ कीं येतचि सुधाकरें। गिळिजे जेंवी॥ ३९॥ तियापरी उभयतां। अज्ञान शब्द गेला वृथा। हा तर्का वांचोन हाता। स्वरूपें नये॥ ४०॥ तरी अज्ञानस्वरूप कैसें। काय कार्यानुमेय असे॥ कीं प्रत्यक्षचि दिसे। धांडोळूं आतां॥ ४१॥ अहो प्रत्यक्षादि प्रमाणीं। कीजे जयाची घेणी॥ ते अज्ञानाची करणी। अज्ञान नव्हे॥ ४२॥ जैशी अंकुरेंसीं सरळ। वेली दिसे वेल्हाळ॥ तें बीज नव्हे केवळ। बीज कार्य होये॥ ४३॥

---

वरील दृष्टान्ताप्रमाणें अज्ञान आत्म्याचे ठिकाणीं, स्वरूपानें अगर वेगळें स्वतंत्रपणानें नसून आत्माच आहे. म्हणून अज्ञानाचा व आत्म्याचा संबंध आहे, किंवा अज्ञान वेगळें स्वतंत्र आहे, हीं दोन्ही बोलणीं तर्कसंगत नाहींत. कारण अज्ञान तत्त्वतः केव्हांच नाहीं, निरंतर आत्माच आहे. ३७. ज्या दोरीवर सर्पाभास झाला त्या दोरीनें त्या भासमान सर्पाला बांधणें होईल काय? ३८. अथवा त्या दोरीपासून त्याला वेगळें तरी करतां येईल काय? दोन्ही असंभव आहे अथवा पौर्णिमेच्या दिवशीं अंधार, दिवसाच्या भीतीनें रात्रीकडे वळला, तो चंद्रानें लगेच त्यास गिळून टाकिलें ३९. त्याप्रमाणें दोन्ही बाजूंनीं अज्ञान शब्द वायां गेला. हें अज्ञान शब्दमात्र आहे; म्हणजे त्याला स्वरूपसिद्धि नाहीं. अज्ञान आहे हा तर्कमात्र आहे. ४० अज्ञान-स्वरूपविषयक विचार करतांना अज्ञान हें कार्यानुमेय आहे कीं प्रत्यक्षसिद्ध आहे, याकडे दृष्टि टाकूं. ४१. प्रत्यक्षादि प्रमाणांनीं ज्या प्रमेयाची देवघेव होते, प्रमाता प्रमाण व प्रमेय ही त्रिपुटी हें अज्ञानकार्य आहे, अज्ञान नव्हे. ४२. अंकुररूपानें सरळ वाढून वेल पसरते, पण तो विस्तार, बीज नाहीं, बीजकार्य होय. ४३.

**कां शुभाशुभरूपें । स्वप्नदृष्टि आरोपे ॥ तें नीद नव्हे जाउपें । निदेचें कीं ॥ ४४ ॥ नाना चांदु एकु असे । तो व्योमीं दुणावला दिसे ॥ तें तिमिरकार्य जैसें । तिमिर नव्हे पैं ॥ ४५ ॥ तैसें प्रमाता प्रमेय । प्रमाण जें त्रय ॥ तें अज्ञानाचें कार्य । अज्ञान नव्हे ॥ ४६ ॥ म्हणोनी प्रत्यक्षादिकीं । अज्ञान कार्य विशेखीं ॥ न घेपे येविषयीं । आनु नाहीं ॥ ४७ ॥ अज्ञान कार्यपणें । घेइजे तें अज्ञान म्हणणें ॥ तरी घेताही करणें । तयाचोंचि ॥ ४८ ॥ स्वप्नीं दिसे तें स्वप्न । मा देखता काय आन ॥ तैसें कार्यचि अज्ञान । केवळ जरी ॥ ४९ ॥ तरी चाखिला गूळ गूळें । माखिलें काजळ काजळें ॥ का घेपे देपे शूळें । हालया शूळें ॥ ५० ॥**

किंवा स्वप्नांत शुभाशुभरूपानें दिसणारें सर्व झोप नाहीं. तें झोंपेचें पिलुं म्हणजे कार्य आहे. ४४. अथवा आकाशांत चंद्र एक असून दोन दिसतात, पण ते दोन दिसणें हें अंधाराचें कार्य आहे, अंधार नव्हे. ४५. त्याप्रमाणें प्रमाता, प्रमाण, प्रमेय ही त्रिपुटी अज्ञानकार्य आहे; स्वयंअज्ञान नव्हे. ४६. ही प्रत्यक्षादि सहा प्रमाणें अज्ञानाची विशेष कार्यें आहेत, त्यांच्याकडून अज्ञानाचें ग्रहण होत नसलें तरी त्या विशेष कार्यावरूनच कारणरूपानें अज्ञान अनुमानलें पाहिजे. ४७. अज्ञानाच्या कार्यावरून अज्ञानसिद्ध आहें असें जर म्हणावें तरी पण ज्या प्रत्यक्षादि प्रमाणांवरून अनुमानानें तो अज्ञानाची सिद्धि करतो. तेंही अज्ञानच होय; कारण चैतन्याव्यतिरिक्त कोणताहि पदार्थ अज्ञानकार्य म्हणून समजलें जातें. ४८. जर स्वप्नांत दिसणारें सर्व एकरूपच आहे तर मग स्वप्न पाहाणारा त्याहून निराळा आहे काय ? त्याप्रमाणें अज्ञानाचें कार्यच जर केवळ अज्ञान आहे असें म्हणालास, ४९. गुळानेंच गुळाची चव घेतली; काजळानेंच स्वतःला काजळ लाविलें किंवा सुळानेंच सुळाला मारलें असें म्हटल्यासारखें होईल. ५०.

**तैसें कारणअभिन्नपणें । कार्यही अज्ञान होणें ॥ तें अज्ञानीच मा कोणें । काय घेपे ॥ ५१ ॥ आतां घेते घेइजे ते ऐसा । विचारु नये मानसा ॥ तरी प्रमाण जाला मासा । मृगजळींचा ना ॥ ५२ ॥ तंव प्रमाणाचिया मापा । न संपडेचि जें बापा ॥ तया आणि खपुष्पा । विशेषु काई ॥ ५३ ॥ मा हे प्रमाणाचि नुरवी । आथी हे कोण प्रस्तावी ॥ येणेंही बोले जाणावी । अज्ञान उखी ॥ ५४ ॥ एवं प्रत्यक्ष अनुमान । यया प्रमाणां भाजन ॥ नहोनी जालें अज्ञान । अप्रमाण ॥ ५५ ॥ ना स्वकार्यातें विये । जें कारणपणा नये ॥ मी अज्ञान ऐसें बिहे । मानू साचें ॥ ५६ ॥**

---

त्याप्रमाणें जर कार्य, कारणरूपानें अभिन्न असेल तर सर्वच अज्ञान झालें; मग घेण्यादेण्याचा व्यवहार करायला शिल्लक उरलाच कोण? ५१. म्हणून प्रमाता आणि प्रमेय असा भेद न राहिल्यामुळें व सर्वच अज्ञान झाल्यामुळें वरील म्हणणें मृगजलांतील माशाइतकेंच सत्य ठरतें. ५२. जी वस्तु प्रमाणानें सिद्ध होत नाहीं त्या वस्तूंत व आकाशपुष्पांत अंतर काय? ५३. मग हें अज्ञान जर प्रमाणालाच उरू देत नाहीं, तर अज्ञान आहे हें सिद्ध कोणीं करावें? याचाच अर्थ या बोलण्यानेंच अज्ञानाचें खंडण झालें. ५४. अज्ञान हें अशा रीतीनें प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि प्रमाणांनीं सिद्ध होण्यास अपात्र असल्यानें तें अप्रमाण म्हणजे खोटें ठरलें. ५५. शिवाय ज्यांत कार्य उत्पन्न करण्याची शक्ति नाहीं तें कारण होऊं शकत नाहीं; तसेंच मी ‘ अज्ञान ’ आहे असें सांगायला जें भितें, त्याला आपण अज्ञान कां मानावें? अहो! ‘ मी ’ अज्ञान आहे, असें हें म्हणणेंहि ज्ञानच नव्हे का? ५६.

**आत्मया स्वप्न दाउ। न सके कीर बहु ॥ परी ठाये ठाउ। निदेजो नेणें ॥५७॥ हें असो जिये वेळे। आत्मपणोंचि निखिळे ॥ आत्मा अज्ञानमेळे। असे तेणें ॥ ५८ ॥ जैसें न करितां मंथन। काष्ठीं अवस्थान ॥ जैसें कां हुताशन। सामर्थ्याचें ॥ ५९ ॥ तैसें आत्मा ऐसें नांव। न साहे आत्मयाची बरव। तैं का अज्ञान हाव। बांधते का ॥६०॥ काय दीप न लाविजे। तैंचि काजळी फेडिजे ॥ कीं नुगवतीया वाळीजे। रूखाची छाया ॥ ६१ ॥ नाना नुठिता देहदशा। कालवूनि लाविजे चिकसा ॥ न घडितां आरसा। उटिजे काई ॥ ६२ ॥ कां वोहाच्या दुधीं। सायची असावी आधीं ॥ मग ते फेडु इये बुद्धि। पवाडु कीजे ॥ ६३ ॥**

---

आत्म्याला, अज्ञान निश्चयेंकरून स्वप्न दाखवूं शकत नाहीं; पण जरी अज्ञान आहे असे धरलें, तरी जेथें तें असतें, त्या आत्म्याला आवरणहि करीत नाहीं, हें कसें ? ५७. बरें, आतां हें राहूं द्या. जेव्हां तुमचा आत्मा अगदीं शुद्ध स्वरूपानें असतो, तेव्हां त्याच्याबरोबरच आमचें अज्ञान आहे. ५८. लाकडें मंथन करण्याच्या पूर्वीं अग्नि ज्याप्रमाणें आपल्या सामर्थ्यानें त्यांत असतो. ५९. त्याप्रमाणें अज्ञान आत्म्याबरोबर असतें. ज्या आत्म्याला 'आत्मा' हें नांवहि सहन होत नाहीं, त्या आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञान शक्य नाहीं. ६०. थोडा तरी जळण्याच्यापूर्वीच दिव्याची काजळी कशी झाडायची किंवा मुळींच न उगवलेल्या झाडाच्या छायेचा परित्याग करावयाचा कसा ? ६१. उत्पन्न न झालेल्या देहाला उटणी केव्हां लावावयाची ? किंवा आरसा तयार व्हायच्या आधीं कसा पुसायचा ? अगर कासेंतल्या दुधाला अगोदर साय असावी आणि मग ती साय निराळी करण्याची युक्ति सुचवावी. ६३.

**तैसें आत्मयाच्या ठाई । जे आत्मेपणा ठाऊ नाहीं ॥ तैं अज्ञान कांहीं । सारिखें कैसें ॥ ६४ ॥ म्हणौनी तेव्हांही अज्ञान नसे । हें जालेंचि असे आपैसें ॥ आतां रिकामें कायसे । नाहीं म्हणो ॥ ६५ ॥ ऐसाही आत्मा जेव्हां । जैं नातळे भावाभावा ॥ अज्ञान असे तेव्हां । तरी तें ऐसें ॥६६॥ जैसें घटाचें नाहींपण । फुटोनि होय शतचूर्ण ॥ किंवा सर्वांपरी मरण । मारवलें ॥६७॥ नाना निदे नीद आली । कीं मूर्छा मूर्छे गेली ॥ कीं अंधारी पडली । आंधकूपी ॥६८॥ कां अभाव अवघडला । कां केळीचा गाभा मोडला ॥ चोखळा असुडला । आकाशाचा ॥६९॥ कां निवाटिया सुदेल विख । मुकियाचें बांधिलें मुख ॥ नाना नुठितां लेख । पुसिलें जैसे ॥७०॥ तैसें अज्ञान आपुलिये वेळ । भोगी हेंचि टवाळ ॥ आतां तरी केवळ । वस्तु होऊनि असे ॥७१॥ देखां वांझ कैशी विये । विरूढती भाजली बियें ॥ कीं सूर्य कोणा लाहे । अंधारातें ॥७२ ॥**

---

त्याप्रमाणें ज्या काळीं आत्म्याच्या ठिकाणीं आत्मपणाचाच ठिकाण नाहीं, अशा केवळ आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञान असें असणार. ६४. या कारणास्तव त्या वेळींहि अज्ञान 'नाहीं नाहीं' असें शेंकडों वेळां केवळ म्हणण्यात काय अर्थ? ६५. याप्रमाणें भावाभावातींत आत्मा जेव्हां असतो, तेव्हां अज्ञान आहे हें म्हणणें कशा प्रकारचें तें आतां ऐका. ६६. कोणत्याच आकारांत नसलेला घट फुटून त्याचे शेंकडों तुकडे झाले किंवा त्याला मरण आलें, ६७. अथवा झोंपेला झोंप आली, किंवा मूर्च्छेला मूर्च्छा आली, किंवा अंधार अंधाऱ्या विहिरींत पडला, ६८. किंवा अभाव संकटांत पडला किंवा केळीचा गाभा मोडला; किंवा आकाशाचा स्वच्छपणा मोडला; ६९ मेलेल्याला विष घातलें, मुक्याला गप्प बसविलें किंवा न लिहिलेलें पुसलें ७०. हें म्हणणें जितकें निरर्थक तितकेंच आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं, अज्ञान साहचर्यानें आहे हें बोलणें अर्थहीन आहे ७१. वंध्या कधीं प्रसूत होते काय? जळालेले बीज उगवतें काय? सूर्याला अंधार कधीं भेटला आहे काय? ७२.

तैसा चिन्मात्रीं चोखडा। भलतैसा अज्ञानाचा झाडा ।। घेतला तऱ्हीं पवाडा । येईल काई ।। ७३ ।। जे सायेचिया चाडे । डहुळे दुधाचे भांडें ।। ते दिसे कीं विघडे । तैसें हें पा ।।७४ ।। नाना नीद धरावया हातीं । चेऊनि उठिला झडती ।। ते लाभे कीं थिती । नासली होये ।। ७५ ।। तेवीं पहावया अज्ञान ऐसें । हें आंगीं पिसें कायसें ।। न पाहतां आपैसें । न पाहणेंचि कीं ।। ७६ ।। एवं कोण्हेही परी । अज्ञानभावाची उजरी । न पडेचि नगरी विचाराचिये ।।७७।। अहो कोण्हेही वेळे ।। आत्मा अथवा वेगळे ।। विचाराचे डोळे । देखते कां ।। ७८ ।। ना निर्धाराचें तोंड न माखे । प्रमाण स्वप्नींही नायके ।। कीं निरुती हन मुके । अनसाईपणा ।।७९ ।। इतुलियाही भागू । अज्ञानाचा तरी तो मागु ।। निगे ऐसा बागु । पडतां कां देवा ।। ८० ।।

---

त्याप्रमाणें ज्ञानस्वरूप आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञानाचा कितीहि शोध घेतला तरी तो सांपडेल काय? सायीच्या दुधाचें भांडें ढवळलें तर दुधावर साय येईल कीं नाहींशी होईल? ७४. अथवा एखादा झोंपलेला झटकन जागा होऊन, आलेल्या निद्रेला हातांत पकडूं म्हणेल तर ती हातीं लागेल कीं नाहींशी होईल? ७५. तेव्हां अशाप्रकारें अज्ञान पाहणें हा वेडेपणा आहे. अज्ञानाचा विचार करावयास गेलें असतां अज्ञान नाहींच आणि ज्या वेळीं विचार करीत नाहीं, त्या वेळीं तर तें सहजच नाहीं; तात्पर्य नाहींच अज्ञानाचा अत्यंताभाव आहे. ७६ याप्रमाणें कोणत्याहि प्रकारें अज्ञानाची सिद्धि विचाराच्या गांवीं होत नाहीं. ७७. अहो, कोणत्याही वेळीं आत्म्याच्या ठिकाणीं किंवा दुसरीकडे विचार दृष्टीनें अज्ञान दिसतें का? ७८. अज्ञानानें निर्धाराचें तोंड माखलें जात नाहीं. प्रमाण तर अज्ञानाला स्वप्नातही पाहात नाहीं. फार काय, अज्ञान वेगळेपणानें निश्चित नाहीं. ७९. जशा प्रकारें सर्व बाजूंनीं अज्ञानाचा पत्ता लागला असता तर बरें झालें असतें. पण त्याचा कांहीं थांग लागत नाहीं. ८०.

**अवसेचेनि चंद्रबिंबें । निर्वाळिलिये सभे ॥ कां मांडले जैसें खांबे । शशविषाणाचे ॥ ८१ ॥ नाना गगनौलाचिया माळा । वांझेचिया झालिया गळा ॥ घापती तो सोहळा । पाविजेत असे ॥ ८२ ॥ आणूनि कासवीचें तूप । भरूं आकाशाचें माप ॥ तरी साचा येती संकल्प । ऐसे ऐसे ॥८३ ॥ आम्ही येऊनि जाऊनी पुढती । अज्ञान आणावें निरुतीं ॥ ते नाहीं तरी किती । वतवतु पा ॥८४॥ म्हणौनि अज्ञान अक्षरें । नमस्तुं आतां निदसुरें ॥ परी आन एक स्फुरे । इयेविषयीं ॥ ८५ ॥ आपणया ना आणिकातें । देखोनि होय देखतें ॥ वस्तु ऐशिया पुरतें । नव्हेचि आंगें ॥ ८६ ॥ तरी ते आपणया पुढें । दृश्य पघळे येवढें ॥ आपण करी फुडें । द्रष्टेपण ॥ ८७ ॥ जेथें आत्मत्वाचें सांकडें । तेथें उठे हे येवढें ॥ आणि उठिलें तरी रोकडें । देखत असो ॥८८॥**

---

आमावास्येच्या चंद्रानें स्वच्छ प्रकाश पाडला; सशाच्या शिंगाचे खांब तयार करून मंडप घातला. ८१. किंवा वांझेच्या मुलाच्या गळ्यात आकाश फुलाच्या माळा घालून सोहळा केला. ८२ कांसवीचे तूप आणून आकाशाचे मापटें भरलें, ह्या दृष्टान्ताप्रमाणें गोष्टी असल्या किंवा घडल्या तर अज्ञान-सिद्धीसंबंधीं जे हें विचार त्यांना सफलता येऊन अज्ञानाचा पत्ता लागला असता. ८३. आम्हीं इकडून तिकडून पुनः पुन्हां अज्ञानाची सिद्धि करण्याचा प्रयत्न केला, परंतु तें नाहींच; पण व्यर्थ गडबड करून काय उपयोग ? ८४. म्हणून आतां ‘ मिथ्या अज्ञान ’ हीं अक्षरेंसुद्धां उच्चारण्याचा उल्लास राहात नाहीं. परंतु अज्ञानाच्या सिद्धीच्या बाबत आणखी एक तर्क असा सुचतो की ८५. आत्मवस्तु आपल्या स्वतःला किंवा दुसऱ्याला दृश्य करून पहाणारी नसून निजस्वरूपानें दृश्यद्रष्टांतीत आहे. ८६. मग आपणा-पुढें दृश्यत्वाला आलेला एवढा विकार, आपणच द्रष्टेपणानें पाहतों हें कसें? ८७. ज्या ठिकाणीं आत्मत्व म्हणणें हें सुद्धां संकट आहे तेथें दृश्याचा विस्तार उठतो व तो प्रत्यक्ष प्रतीतीसहि येतो. ८८.

**न दिसे जरी अज्ञान । तरी आहे हें नव्हे आन ॥ यया दृश्या अनुमान । प्रणाम जालें ॥ ८९ ॥ नातरी चंद्र एकु असे । तो व्योमीं दुणावला दिसे ॥ तरी डोळा तिमिर ऐसें । मानूं ये कीं ॥ ९० ॥ भूमीवेगळीं झाडें । पाणी घेती कवणीकडे ॥ न दिसती आणि अपाडे । साजीं असती ॥ ९१ ॥ तरी भरवसेनी मूळें । पाणी घेती हें न ढळे ॥ तैसें अज्ञान कळे । दृश्यास्तव ॥ ९२ ॥ चेइलेया नीद जाय । निद्रिता तंव ठाउवी नव्हे ॥ परी स्वप्न दाऊनी आहे । म्हणों ये कीं ॥ ९३ ॥ म्हणूनि वस्तुमात्रें चोखें । दृश्य जरी येवढें फाके ॥ तेव्हां अज्ञान आथी सुखें । म्हणों ये कीं ॥ ९४ ॥ अगा ऐशिया ज्ञानातें । अज्ञान म्हणणें केउतें ॥ काय दीवो करी तयातें । अंधारु म्हणिपे ॥ ९५ ॥**

---

म्हणून जरी अज्ञान दिसत नाहीं तरी अज्ञान आहे हें खोटें नाहीं. कारण यास प्रमाण दृश्य अनुमान हें आहे; म्हणजे दृश्यामानावरूनच अज्ञान सिद्ध होतें. ८९. किंवा आकाशात चंद्र एक असून जर दोन दिसले, तर डोळ्यांत तिमिर दोष आहे, असें मानावें लागतें. ९०. झाडें पृथ्वीशिवाय दुसरीकडून पाणी घेतांना दिसत नाहींत आणि ताजीं टवटवीत तर दिसतात. ९१. त्यावरून झाडाचीं मुळें पाणी शोषून घेतात, हें कबूल करावेंच लागतें. त्याप्रमाणें दृश्यावरून अज्ञानाची सिद्धि होते. ९२. जागृत पुरुषाला झोंप नसते आणि निजलेल्याला तर झोंप ठाऊक नाहीं, पण ज्या अर्थी स्वप्न दिसतें त्या अर्थी निद्रा आहे असें म्हणावेंच लागतें. ९३. म्हणून निर्मल वस्तुमात्र आत्म्याच्या ठिकाणीं जर एवढा दृश्याचा पसारा दिसतो, तर अज्ञान आहे असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. ९४. अहो, हें बोलणें सारें ज्ञान आहे. त्या ज्ञानालाच अज्ञान असें कसें म्हणावें ? जो प्रकाश करितो त्याला काय अंधार म्हणावें ? ९५.

अगा चंद्रापासूनि उजळ । जेणें राविले वस्तु धवल ॥ तयातें काजळ । म्हणिजेत असे ॥ ९६ ॥ आगीचें काज पाणी । निफजा जरी आणी ॥ अज्ञान इया वाहणी । मानूं तरी ते ॥ ९७ ॥ कळीपूर्ण चंद्रमा । आणवूनि मेळवी आमा ॥ तरी ज्ञान हें अज्ञान नामा । पात्र होइजे ॥ ९८ ॥ वोरसोनि लोभें । विष का अमृतें दुभे ॥ ना दुभे तरी लाभे । विषचि म्हणणें ॥ ९९ ॥ तैसा जाणणेयाचा वेव्हारु । जेथे माखला समोरु ॥ तेथें आणिजे पुरु । अज्ञानाचा ॥ १०० ॥ तया नांव अज्ञान ऐसें । तरी ज्ञान होआवें तें कैसें ॥ येऱ्हवीं कांहींच असे । आत्मा काई ॥ १०१ ॥ कांहींच जया न होणें । होय तें स्वतां नेणें ॥ शून्याची देवांगणें । प्रमाणासी ॥ १०२ ॥ असें म्हणावया जोगें । नाचरे कीर आंगें ॥ परी नाही हें नलगे । जोडावेंचि ॥१०३॥

एखादी वस्तु स्वच्छ करून चंद्रापेक्षांहि उजळ केली तर तिला काजळ असें म्हणतां येईल काय ? ९६. अग्नीचें काम जर पाणी करूं शकेल, तर हें दृश्य अज्ञानापासून विस्तारलेलें आहे असें खुशाल मानावें. ९७. सर्व काळांनीं नटलेला पौर्णिमेचा चंद्र जर दर्शन घडवील तर हें ज्ञान, अज्ञान, या नांवाला पात्र होईल. ९८. विषानें अत्यन्त प्रेमानें पान्हा सोडला तर तें काय अमृत देईल ? विषानें पान्हा सोडला तरी विषच दुभणार. ९९. त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं ह्या सर्व ज्ञानाचा व्यवहार प्रत्यक्ष ओतप्रोत भरलेला दिसतो, त्या ठिकाणीं अज्ञानाचा पूर आला आहे असें म्हणणें कसें शोभेल ? १००. ज्ञानाच्या सर्व व्यवहाराला अज्ञान म्हणतो तर ज्ञानाचें स्वरूप काय ? वास्तविक सर्व ज्ञानरूप आत्माच आहे. १०१. ज्या आत्म्याला कांहींच होणें नाहीं, त्या आत्म्याला 'मी आहें' 'इदमित्थम्' म्हणजे आत्मा असा किंवा आत्मा शून्य आहे असा कोणताहि निर्णय करितां येत नाहीं अशी प्रमाणांनीं शपथच घेतली. १०२. 'आहे' असें म्हणण्यासारखी आत्म्याला स्वरूप-स्थिति नाहीं, मग 'नाहीं' हें म्हणायाचें प्रयोजन नाहीं. सारांश, 'आहे; नाहीं' अशा दोहीं धर्मांनीं शून्य आत्मा आहेपणानेंच आहे. १०३.

**कोण्हाचे असणेनवीण असे । कोण्ही न देखतांचि दिसे ।। हे आथी तरी कायसें । हारतलेपण ।। १०४ ।। मिथ्या वादाची कुटी आली । ते निवांतचि साहिली ।। विशेषाही दिधली । पाठी जेणें ।। १०५ ।। जो निमालीही नीद देखे । तो सर्वज्ञ येव्हढा काय चुके ।। परी दृश्याचिये न ठके । सोइ जो ।। १०६ ।। वेदु काय काय न बोले । परी येथें नांवचि नाहीं घेतलें ।। ऐसें कांहीं जोडलें । नाहीं जेणें ।। १०७ ।। सूर्य कोणा न पाहे । परी आत्मा दाविला आहे ।। गगनें व्यापितां ठाये । ऐशी वस्तु ।। १०८ ।। देह हाडाची मोळी । मी म्हणोनी पोटाळी ।। तो अहंकारु गाळी । पदार्थु हा ।। १०९ ।। बुद्धि बोध्या सोके । ते येवढी वस्तु चुके ।। मना संकल्प निके । याहीहूनी ।। ११० ।।**

कोणाच्या असण्यावांचून आत्मा आपल्या स्वरूपानें आहेच. कांही न पाहतां, तो पाहणेपणानेंच आहे. असा स्वयंसिद्ध आत्मा ' नाहीं ' असें कसें म्हणतां येईल ? १०४. आत्मा हा नाहींपणाचा आळसुद्धा मुकाट्यानें सहन करितो, व तसेंच कोणी सच्चिदानंदादि विशेष भावाला आणले असतां स्वस्थ असतो. १०५. जो सर्व लयाचा साक्षी आहे, तो सर्वज्ञ एवढें दृश्य पाहण्यास असमर्थ आहे काय ? परंतु तत्त्वतः दृश्याचा अभाव आहे म्हणून दृश्याच्या गावाच्या शिवेपर्यंतहि आत्मा जात नाहीं. १०६ वेदानें इतर सर्व प्रतिपादन केलें, पण आत्म्याचें नांवही घेतलें नाहीं; म्हणजे अमुक प्रकारचा, अशा तऱ्हेचा आत्मा आहे असें सिद्ध केलें नाहीं. १०७. सूर्य कोणास प्रकाशित करीत नाहीं ? पण त्यानें आत्म्याला प्रकाशित केलें नाहीं. त्याचप्रमाणें आकाश आत्म्याला व्याप्त करूं गेलें असतां त्याची व्याप्तिच थांबते. १०८. हाडाची मोळी असा हा देह त्यावर अहंकार आपली सत्ता चालवितो; पण तो आत्मस्वरूपाला मात्र वगळतो. १०९. बुद्धि सर्व विषयांना जाणते, पण एवढ्या आत्मवस्तूला मात्र जाणत नाहीं; मनहि आत्मस्वरूपावांचून संकल्प करण्यास योग्य आहे. ११०.

**विषयांचिया बरडी । अखंड घासती तोंडीं ॥ ते इंद्रियें गोडी न घेपती हे ॥ १११ ॥ परी नाहींपणा सकट । खाऊनी भरलें पोट ॥ ते कोणाही सकट । कां फावेल ॥ ११२ ॥ जो आपणासी नव्हे विखो । तो कोणा लाहे देखो ॥ जे वाणी न सके चाखों । आपणापें ॥ ११३ ॥ हें असो नांवें रूपें । पुढाखूनि अमूपें ॥ जेथें आलीच वासिपे । अविद्या हे ॥ ११४ ॥ म्हणौनि आपुलेंचि मुख । पहावयाची भूक ॥ न बाणे मा आणिक । के रिघेल ॥ ११५ ॥ नाडिलें जे वादीकोडे । आतुचि बाहेरी सवडे ॥ तैसा निर्णो सुनाथा पडे । केला येथें ॥ ११६ ॥**

---

विषयरूपीं जमिनीवर खडबडीत इंद्रियें तोंड घासतात, पण तीं आत्म्याची गोडी घेण्यास असमर्थ आहेत. १११. ज्या परमात्मवस्तूनें नाहींपणसुद्धां खाऊन टाकून आपलें पोट भरलें म्हणजे यावत् दृश्यामात्राचें जो ग्रहण करतो, तो परिपूर्ण आत्मा कोणास प्राप्त होईल ? ११२. जो आत्मा स्वतःला विषय होत नाहीं, त्याला पाहण्यास कोणता अनात्मपदार्थ समर्थ होईल ? जीभ आपला स्वाद घेऊं शकत नाहीं व तिचा स्वाद दुसऱ्याकडूनहि घेतला जात नाहीं. ११३. हें असो. अविद्या पुष्कळ नामरूपें पुढें करून ज्या परमात्मस्वरूपाच्या पुढें येतांच भयानें नाहींशीं होते. ११४. म्हणून ज्या ठिकाणीं आपलें स्वरूप पहाण्याचा संकल्प देखील उठत नाहीं, तेथें दुसऱ्याचा प्रवेश होईल असें म्हणणें योग्य आहे काय ? ११५. जुगारी चामड्याची वादी गुंडाळून त्यांत मध्यें काडी घालून ती वादी ओढतो. पण शेवटीं पाहावें तर ती काडी त्या गुंडाळींत कांहीं अडकलेली नसेतच. तो प्रयत्न फुकटच जातो. तसेंच 'इदम् इत्थम्' असें कितीहि वेळां जरी सांगितलें तरी आत्मस्वरूपाची निश्चित ओळख पटणें कठीण आहे. तें बोलणें फुकट जातें. ११६.

**कां मस्तकांत निर्धारिली । जो छाया उडों पाहे आपुली ॥ तयाची फाकावली । बुद्धि जैशी ॥ ११७॥ तैसें टणकोनी सर्वथा । हे ते ऐशी व्यवस्था ॥ करी तो चुके होता । वस्तूचा जिये ॥ ११८॥ आतां सांगिजे तें केउतें । शब्द संसारा नाहीं जेथें ॥ दर्शना बीजें तेथें । जाणीव आणी ॥ ११९ ॥ जयाचेनि बळें । अचक्षुपण आंधळें ॥ फिटोनि वस्तु मिळे । देखणी दिशा ॥ १२० ॥ आपुलेंचि दृश्यपण । उमसों न लाहे आपण ॥ दृष्टत्वा कीर आण । पडली असता ॥ १२१ ॥ कोणा कोण भेटे । दिठी कोंचि फुटे ॥ ऐक्यासकट पोटें । आटोनि गेली ॥ १२२ ॥ येवढें हीं सांकडे । जेणे सारूनी येकीकडे ॥ उघडलीं कवाडें । प्रकाशाचीं ॥ १२३ ॥**

---

डोक्यापासून पायाच्या नखापर्यंत पडलेल्या लांबलचक सावलीवरून पलीकडे उडीं मारणें ह्या खटपटींत ज्याची बुद्धि गुरफटलेली असते ११७. त्याप्रमाणें खूप परिश्रम करून वस्तु जशा प्रकारची आहे, तशा प्रकारची आहे अशा निर्णयापर्यंत येणाऱ्या माणसाच्या हातीं कांहींच येत नाहीं. वस्तूचा बोध होतच नाहीं. ११८. सांगून किती सांगणार ? शब्दांनीं, आत्मस्वरूप जाणण्याच्या बाबतींत कांहीं मात्राच जेथें चालत नाहीं तेथें दृश्य, द्रष्टा, दर्शन यांच्यांतील भेदांचें ज्ञानानें आत्मस्वरूपाचा बोध होईलच कसा ? जाणीव होण्याच्या बाबतीत ' कांहीं न दिसणें ' ही अंधावस्था जाऊन वस्तूला द्रष्टेपण प्राप्त झालें आहे. ११९. १२०. त्याची बघण्याची स्थिति लोप पावते. कारण तो स्वतःचें दृश्यत्व पाहण्यास असमर्थ आहे. १२१. तेथें कोणाला आणि कोणी बघावयाचें ? भेटायचें ? दृष्टीला तरीं पाहणेंपण कसें मिळणार ? सारें काहीं एकरस एकपणांत सामावलें आहे. १२२. आपल्या कोणत्याहि धर्म नसण्याच्या स्थितीचें अपार वैभव बाजूस सारून जो केवळ ज्ञानाच्या विलासासाठीं प्रकाशाचीं द्वारें खुलीं करण्यांत रमला, जो सर्व त्रिपुट्या स्वतःच बनला. १२३.

**दृश्याचिया सृष्टी । दिठीवरी दिठी ।। उठलिया तळवटी । चिन्मात्रचि ।। १२४ ।। दर्शनारिद्धि बहुवसा । चित्तशेषु मातला ऐसा ।। जे शिळा न पाहे आरिसा । वेद्यरत्नाचा ।। १२५ ।। क्षणाक्षणीं नीच नवी । दृश्याची चोख मदवी ।। दिठीकरवी वेढवी उदार जे ।। १२६ ।। मागीलिये क्षणीचीं आंगें । पारसी म्हणोनिया वेगें ।। सांडूनि दृष्टि रिघे । नवीया रूपा ।। १२७ ।। तैशीच प्रतिक्षणीं । जाणिवेचीं लेणीं ।। लेवोनी आणी ।। जाणतेपणा ।। १२८ ।। तया परमात्मपदींचें शेष । ना कांहीं तया सुमास ।। आणि होय येवढी कास । घातली जेणें ।। १२९ ।। सर्वज्ञतेची परी । चिन्मात्राचें तोंडवरी ।। परी ते आन घरीं । जाणिजेना ।। १३० ।।**

या सर्व उत्पत्तीला एक चिन्मात्र परमात्माच मूलाधार आहे. मग विविध दृश्यांनी युक्त अशी सृष्टी उत्पन्न झालेली असो किंवा ज्ञानापाठीमागें अनेक ज्ञानें उदित झालेलीं असोत ! १२४. हीं बहुविध वैभवें निर्मिण्यात चिदंश इतका रमला कीं त्या पूर्वीच्या सृष्टपदार्थरूप जुन्या आरशाकडे त्याचें लक्षच जाईना ! १२५. क्षणाक्षणाला नवीन असणाऱ्या दृश्यांना तो द्रष्टा आपल्या दर्शनरूप स्त्रीकडून तलम सुंदर वस्त्रें नेसवूं लागला. इतका तो उदार आहे. १२६. मागील क्षणाचें दृश्य जुनें शिळें झालें म्हणून ते तो ताबडतोब टाकून देतो व नवीन नवीन रूप पाहण्यात मग्न होतो. १२७. प्रत्येक क्षणाला हा परमात्मा ज्ञानाचे नवे अलंकार घालून आपल्याला दर्शनीय बनवितो. १२८. इतकें करूनहि त्या परमात्म्याला संतोष होईना म्हणून ब्रह्माण्डाएवढ्या विस्तरानें विनटण्यासाठीं त्यानें कंबर बांधली. १२९. केवळ परमात्म्याच्या स्वरूपांशी ज्ञानाचें सर्व प्रकार संबंधित होतात, पण त्या सर्वांचा परमात्म्याठायीं मुळींच अंश नसतो. १३०.

**एवं ज्ञानाज्ञानमिठी । तेही फाकतसे दिठी ॥ दृश्यपणें ये भेटी । आपुलिया ॥ १३१ ॥ तैं दृश्य मोटकें देखें । आपण स्वयें द्रष्टत्वें तोखे । तेंचि दिठीचेनि मुखें । माजी दाटे ॥१३२॥ तेव्हां घेणें देणें घटे ॥ परी ऐक्याचें सूत न तुटे ॥ जेवीं मुखींमुख वाटे । दर्पणें केलें ॥१३३॥ आंगें आंगावरी पहुडे । चेइला वेगळा न पडे ॥ तया वारुवाचेनि पाडें । घेणें देणें ॥ १३४॥ पाणी कल्लोळाचेनि मिसें । आपणापें वेल्हावे जैसें ॥ वस्तु वस्तुत्वें खेळों ये तैसें । सुखें लाहे ॥१३५॥ गुंफी ज्वाळाचिया माळा । लेइलियाही अनळा । भेदाचिया आहाळा । काय पडणें आहे ॥ १३६ ॥**

---

जगांत कोणालाहि ज्ञानाचा किंवा अज्ञानाचा हा व्यवहार दिसतो, पण तो सर्व पाहण्यायोग्य करून आत्मा आपला आपणच दृश्य होऊन भेटतो. १३१. आणि गंमत ही कीं, तें दृश्य बघून स्वतः द्रष्टाच संतुष्ट होतो, तेंच दृश्यपण आणि द्रष्टेपण परमात्मरूपांत मिळून जातें. १३२. यांत दिल्या-घेतल्याची कृती झाल्यासारखी वाटते, पण मूळच्या एकपणाला बाध येत नाहीं. आरसा मुखाचें प्रतिबिंब दाखविण्याचें कार्य करूनहि मूळचें तोंड कांहीं बदलत नाहीं. तें जाग्यावरच असतें. १३३. घोडा उभ्यानें झोंप घेतो पण त्याची झोंप संपल्यावर त्याच्या उभे असण्यांत कांहीं बदल होत नाहीं. अगदीं तसेंच याच्या ठिकाणीं देण्याघेण्याचे सारे व्यवहार होतात. १३४. लहरींच्या मिषानें जळ विलास अनुभवितें तशाच पद्धतीनें पर-मात्मा सहजपणानें क्रीडा करीत असतो असें अनुभवाला येतें. १३५. विस्तवानें ज्वालांचे हार गळ्यात घालून घेतले आहेत असें म्हणण्यानें ज्यापासून ज्वाला निर्माण होतात त्या अग्नीच्या मूळ स्थितींत कांहीं बदल तर नाहीं ना होत ? १३६.

**कीं रश्मीचेनि परिवारें । वेढूनि घेतला थोरें ॥ तऱ्ही सूर्यासी दुसरें । बोलों येईल ॥१३७॥ चांदाणियाचा गिंवसु । चांदावरी पडलिया बहुवसु ॥ काय केवळपणीं त्रासु । देखिजेल ॥ १३८॥ दाळचिया सहस्रवरी । फांको आपुलिया परी ॥ परी नाहीं दुसरीं । भास कमळीं ॥ १३९ ॥ सहस्रवरी बाहिया । आहाति सहस्रार्जुनाराया ॥ तरी तो काय तिया । एकोत्तरावा ॥१४०॥ सौकटीचिया वोजा । पसरो कां बहु पुंजा ॥ परी ताथूवीण दुजा । भाव आहे ॥१४१॥ कोडीवरी शब्दाचा । मेळावा घरीं वाचेचा ॥ मिनला तरी वाचा । मात्र कीं ते ॥ १४२ ॥ तैसे दृश्याचे डाखळे । नाना दृष्टीचे उमाळे । उठती लेखा वेगळे । दृष्टत्वोंचि ॥ १४३ ॥**

प्रकाशाच्या किरणांनीं सूर्याला वेढून टाकलें आहे. अशा स्थितींत तेथें सूर्याशिवाय दुसरा कोणी निर्माण होतो काय? १३७. चंद्रम्यावर चांदण्यांचा खूप उजेड पडला तरी चंद्रम्याला त्याची कांहीं कटकट होईल काय? १३८. आपणच हजारों दलांनीं विस्तार पावलें तरी कमळाच्या ठिकाणीं कमळावांचून दुसऱ्या शब्दाचा प्रयोग नाहीं. १३९. सहस्रार्जुन राजाला हजार हात आहेत म्हणून सहस्र हात, आणि अर्जुन एक, मिळून हजार आणि एक हाताच अर्जुन होईल का? १४०. कोष्टयाच्या मागावर सुताच्या पुष्कळ गुंड्या नीट ठेवणें तरी तेथें सुतावांचून दुसरें काय? १४१. वाणीच्या ठिकाणीं कोट्यावधि शब्द उत्पन्न झाले तरी तो सर्व शब्दसमुदाय वाणीरूपच आहे. १४२. त्याप्रमाणें एका परमात्म्यावरच अनंत दृश्य पदार्थ, अनंत दर्शनें (ज्ञानें) व त्यांचे अनंत द्रष्टे, या सर्व त्रिपुट्या कल्पित आहेत; सर्व परमात्मरूपच तेथें भेदाचा लवलेश नाहीं. १४३.

गुळाचा बांधा । फुटलिया मोडीचा धांदा ॥ जाला तरी नुसधा । गुळचि कीं तो ॥ १४४ ॥ तैसें हें दृश्य देखो । कीं बहु होऊनि फांको ॥ परी भेदाचा नव्हे विखो । तेंचि म्हणवूनि ॥१४५॥ तया आत्मयाच्या भाखा । न पडोचि दूसरी रेखा ॥ जरी विश्वा अशेखा । भरलें आहे ॥ १४६ ॥ दुबंधी क्षीरोदकीं । वाने परी अनेकीं ॥ दिसती तरी तितुकीं । सुतें आथी ॥१४७॥ पातयाची मिठी । नुकलितां दिठी ॥ अवघीयाची सृष्टी । पाविजे जरी ॥१४८॥ न फुटता बीजकणिका- । माजी विस्तारे वडु असिका ॥ तरी अद्वैत फाका । उपमा आथी ॥ १४९ ॥ मग माते म्यां न देखावें । ऐसेंही भरे हांवें ॥ तरी आंगाचिये विसवे । सेजेवरी ॥ १५० ॥

---

गुळाची ढेप फुटून तिची अनेक खंडें म्हणजे भेद व प्रतीति झाली; गुळांत भेदप्रतीति न होतां, तो गूळपणानें तसाच आहे. १४४. परमात्मा द्रष्टा होऊन दृश्य पाहो किंवा आपण स्वतःचा पुष्कळ पुष्कळ होऊन विस्तार करो, पण तितक्या रूपांनीं तो स्वतःच होतो म्हणून भेदाला कांहीं विषय नाहीं होत. १४५. हें अनंत द्वैतानें भरलेलें जगत् जरी सर्व परमात्मरूप आहे तरी परमात्मवस्तूच्या द्वैतपणाची जाणीव होता नाहीं. १४६. गंगाजमनी वस्त्रामध्यें अनेक प्रकारच्या रंगांच्या तऱ्हा दिसल्या तरी तितक्या प्रकारचे तंतु आहेत थोडेच? १४७. जर पापण्या उघडल्याशिवाय डोळा सृष्टि पाहू शकेल, १४८. किंवा बीज अंकुर आल्याशिवाय सर्व वड विस्तार पावेल, तरच ह्या अद्वैत पसाऱ्याला एखादी उपमा मिळेल. १४९. मग जसा आपणांस पाहूं नये अशी इच्छा उत्पन्न झाली असतां तो आपल्या अंगच्याच शय्येवर विश्रांती पावतो म्हणजे अधिष्ठानरूप होतो. १५०.

**पातयाची मिठी । पडिलिया कीजे दिठी ॥ आपुलियेची पोटीं । रिगोनी असणें ॥ १५१ ॥ कां नुदेलिया सुधाकरु । आपणपें भरे सागरु ॥ ना कूर्मी गिळी विस्तारु । आपेआप ॥१५२॥ आवसेचिये दिवशीं । सतराविये अंशीं ॥ स्वयें जैसे शशी । रिगणें होय ॥ १५३ ॥ तैसें दृश्य जिणतां द्रष्टे । पडिले जैताचिये कुटे ॥ तया नांव वावटे । आपणपेया ॥ १५४ ॥ सहजें आवघेंचि आहे । तरी कोणा कोण पाहे ॥ तें देखणेंचि आहे । स्वरूपनिद्रा ॥१५५॥ नाना न देखणें नको । म्हणे मीचि मातें देखो ॥ तरी आपेआप विखो । आपैसें असे ॥ १५६ ॥**

---

पापण्या बंद केल्यावर दृष्टी जशी आपल्यांत सामावून राहाते. १५१. किंवा चंद्र उगवला नसतांना समुद्र जसा स्वतःत पूर्ण असतो, अथवा स्वेच्छेनें कासवी सहज आपला विस्तार आपल्यांत सामावून टाकते. १५२. अथवा अमावास्येच्या दिवशी जसा चंद्र सतराव्या कलेंत म्हणजे मूळ स्वरूपांत प्रवेश करतो, १५३. त्याप्रमाणें दृश्य जिंकल्यामुळे द्रष्ट्यावर जिंकलेपणाचा आळ येतो, त्या जिंकलेपणाच्या आळाला स्वरूपांत ओहोटणें म्हणतात, म्हणजे मूळचें स्वरूप असणें हीच स्थिति कायम रहाते. १५४. जर जगत् मूलचेंच ब्रह्मरूप तर कोणी कोणास बघावयाचें ? तेथें अधिष्ठानें पाहणें आणि न पाहणें याशिवाय पाहणेंपणानें आहे आणि या स्थितीलाच योगनिद्रा असें म्हणतात. १५५. आतां व्यवहाराच्या भाषेत जें न देखणें आहे, तें नको ! मी आपल्यासच बघून ज्ञानाचा व्यवहार करावा असें वाटलें तरी पण त्या ज्ञानाच्या व्यवहारास विषय सहजपणें तोच होतो. १५६.

जें अनादीच दृश्यपणें । अनादीचि देखणें ।। हें आता काय कोणें । रचूं जावें ।। १५७ ।। अवकाशेंशी गगना । स्पर्शेशी पवना ।। कीं दीप्तीशीं तपना । समंधु कीजे ।। १५८ ।। विश्वपणें उजिवडे । तरी विश्व देखे पुढें ।। ना तें नाहीं तरी तेवढें । नाहींच देखे ।। १५९ ।। विश्वाचें असें नाहीं । विपायें बुडालियाहीं ।। तऱ्ही दशा ऐशीही । देखताचि असे ।। १६० ।। कापुराही आथी चांदिणें । कीं तोचि न मखे तेणें ।। तैसें केवळ देखणें । ठायें ठावो ।। १६१ ।। किंबहुना ऐसें । वस्तु भलतिये दशे ।। देखतचि असे । आपणपयातें ।। १६२ ।। मनोरथांचीं देशांतरें । मनीं प्रकाशूनि नरें ।। मग तेथें आदरें । हिंडे जैसें ।। १६३ ।।

---

कारण, परमात्मवस्तु दृश्यदर्शनरूपानें अनादीच शोभली आहे. मग मग आतां दृश्य-द्रष्टा–भावाची कोणीं नवीन रचना करावयाची आहे कोठें ? १५७. आकाशाचा अवकाशाशीं, वायूचा गतीशीं, अग्नीचे प्रकाशाशीं वेगळें नातें कोणीं जोडावयास नको, कारण मूळचे दोन्ही एकच आहेत. १५८. विश्वाचा प्रकाश झाला तरी निश्चयेंकरून विश्व पाहतो किंवा तें विश्व नाहींसें झालें तरी तेवढा नाहींपणाही तो पाहतो. १५९. विश्वाची उत्पत्ति व लय दोन्ही नाहींशीं झाल्यावर जी उरणारी स्थिति त्या स्थितिलाही पाहणारा तोच असतो. १६०. पांढरेपणा चंद्राच्या चांदण्याच्या पांढरेपणानें माखलेला नाहीं तर तो स्वतःच पांढरा आहे, त्याप्रमाणें वस्तु केवळ आपल्या ज्ञानस्वरूपानेंच आहे. १६१. फार काय वस्तु कोणत्याहि काळीं आणि कोणत्याहि स्थळीं मनोराज्याची सृष्टि रचून त्या सृष्टीत मनुष्य प्रेमानें हिंडतो. १६२–१६३.

कां दाटला डोळा डोळया । डोळाचि तारा होऊनियां ॥ स्फुरे चोख म्हणोनिया । विस्मो नाहीं ॥ १६४ ॥ यालागीं एकें चिद्रूपें आपणपया आपणपे ॥ देखिजे कां आरोपे । काय काज ॥ १६५ ॥ किळेचें पांघरुण । आपजवी रत्ना कोण ॥ कीं सोनें ले सोनेपण । जोड जोडूं ॥ १६६ ॥ चंदन सौरभ वेढी । कां सुधा आपणया वाढी ॥ कीं गूळ चाखे गोडी । ऐसें आथीं हें ॥१६७॥ कीं उजाळाचे फोळे । कापुरा पुटीं दिधले ॥ कीं ताऊनि ऊन केलें । आगीतें काई ॥ १६८ ॥ नाना ते लता । आपुले वेली गुंडाळतां ॥ घर करी न करितां जयापरी ॥ १६९॥ कां प्रभेचा उभळा ॥ दीप प्रकाशे संचला ॥ तैसा चैतन्यें निवासिला । चिद्रूप स्फुरे ॥१७०॥ ऐसें आपणया आपण । आपुलें निरीक्षण । करावें येणेंवीण । करीतूचि जसे॥१७१॥

अगर डोळा असा डोळाच चित्रविचित्र होऊन जसा नटतो; तसा शुद्ध आत्मा सर्व त्रिपुट्या स्वतःच नटतो ह्यांत नवल नाहीं. १६४. मग आपणच आपल्यास पाहिलें असा एकाच ज्ञानरूप आत्म्यावर आरोप करण्याचें काय कारण? १६५. रत्नावर कोणी प्रभेचें पांघरूण घालतो का? किंवा सोने काढून दुसरीकडून मागवून सोनेपणा आपल्या अंगावर घालतें काय? १६६. चंदनानें काय सुगंध पांघरलेला आहे किंवा अमृत आपल्याला चाखायला अमृत स्वतःच वाढ करतें का? गूळ आपली गोडी घेतो असे कांहीं आहे का? १६७. स्वच्छपणाच्या प्रभेनें कापुरावर पुट दिलें आहे का? किंवा अग्नीला तापवून ऊन केलें आहे काय? १६८. अथवा वेल आपल्या देहाच्या गुंडाळण्यानें जसें सहज घर करतें १६९ किंवा प्रभेच्या उत्कर्षानें दिवा जसा प्रकाशमान असतो, त्याप्रमाणें चैतन्याच्या व्याप्तीनें चिद्रूप स्फुरतें. १७०. याप्रमाणें 'आपलें निरीक्षण आपण स्वतः करावे' असा हेतु न ठेवतां निरीक्षण करीतच आहे. १७१.

**ऐसें हें देखणें न देखणें । हें आंधारें चांदिणें ॥ मा चंद्रासी उणें । स्फुरतें कां ॥ १७२ ॥ म्हणूनि हें न व्हावें । ऐसेंही करूं पावे ॥ तरी तैसाचि स्वभावें । आइता असे ॥ १७३ ॥ द्रष्टा दृश्य ऐसें । दोनी अळुमाळ दिसे ॥ तेंही परस्परानुप्रवेशें । कांहींना कीं ॥ १७४ ॥ तेथें दृश्य द्रष्टा भरे । द्रष्टेपण दृश्यीं सरे ॥ मा दोन्ही न होऊनि उरे । दोहींचें साच ॥ १७५ ॥ मग भलतेथ भलतेव्हां । माझारिले दृश्य द्रष्ट भावा ॥ आटणी करीत खेवा । येती दोन्ही ॥ १७६ ॥ कापुरीं अग्निप्रवेशु । कीं अग्नीं घातला पोतासु ॥ ऐसें नव्हे संसरिसु । वेचु झाला ॥१७७॥ एका एकु वेचला । शून्यबिंदु शून्यें पुशिला ॥ द्रष्टा दृश्याचा निमाला । तैसें होय ॥ १७८ ॥**

---

सारांश देखणें न देखणें आत्म्याच्या ठिकाणीं नाहीं. हा अंधकार व हा प्रकाश अशा समविषम भावाची स्फूर्ति चंद्राच्या जवळ कुठे आहे ? १७२. म्हणून ही त्रिपुटी आपण होऊं नये अशी स्फूर्ति झाली तरी स्वभावतः तो तसा सिद्धच आहे. १७३. द्रष्टा व दृश्य असे दोन भाव जरी थोडेसे दिसतात तरीं दोघांचा परस्परांत प्रवेश झाला असतां दोन्हींही भाव नाहींसे होतात. १७४. तेव्हां द्रष्टा दृश्यांत दृश्य दृष्ट्यांत नाहींसें होतें; मग दोघांचा अभाव होऊन दोघांचे अधिष्ठान मात्र शिल्लक राहतें. १७५. मग वाटेल तेथें, वाटेल त्या वेळीं, दृश्य द्रष्टा हे दोन भाव आपलीं आटणी करून मध्य-दर्शन संबंधींत एकरूप होतात. १७६. अग्नीचा कापुरांत किंवा कापुराचा अग्नींत प्रवेश झाला असें कशाला म्हणावें ? कारण दोघांचा नाश एक-दमच होतो. १७७. एकांतून एक वजा केला असतां बाकी शून्य राहते ! व तें शून्य आपला स्वतःचा अभाव दाखवितें; त्याचप्रमाणें द्रष्टा व दृश्य यांची वाटणी झाली असता होतें. १७८.

**किंबहुना आपुलिया । प्रतिबिंबा झोंबिनलिया ॥ झोंबी सकट आटोनियां । जाइजे जेवीं ॥ १७९ ॥ तैसें रुसतां दृष्टीं । द्रष्टा दृश्य भेटी ॥ येती तेथें मिठी । दोहींची पडे ॥ १८० ॥ सिंधु पूर्वापर । न मिळती तंवचि सागर । मग एकवट नीर । जैसें होये ॥१८१॥ बहु ये हे त्रिपुटी । सहजें हो तया राहटी ॥ प्रतिक्षणीं काय ठो । करीतसे ॥ १८२ ॥ दोन्ही विशेष गिळी । ना निर्विशिष्टातें उगळी ॥ उघडी झापी एकी डोळी । वस्तूची हे ॥ १८३ ॥ पातया पातें मिळे । कीं द्रष्टत्वें सैंघ पघळे ॥ तिये उन्मळितां मावळें । नवलावो हा ॥१८४॥ द्रष्टा दृश्याच्या ग्रासीं । मध्यें लेख विकाशी ॥ योगभूमिका ऐशी । आंगीं वाजे ॥ १८५ ॥**

---

फार काय सांगावें ? ज्याप्रमाणें एखादा पुरुष प्रतिबिंबाला आलिंगन देऊं लागला असतां आलिंगनासकट बिंबप्रतिबिंबभाव आटतो. १७९. त्याप्रमाणें दर्शन नाहींसें होतांच द्रष्टा दृश्याचे भेटीस येतो व त्या भेटींत दोघांचें ऐक्य होतें, १८०. पूर्वेचा आणि पश्चिमेचा असे दोन वेगळाले समुद्र एकमेकांस मिळत नाहींत, तोपर्यंत त्यांस सागर असें नांव असतें. मिळाले, म्हणजे मग सर्व पाणीच होतें. त्याप्रमाणें आत्मा निधर्मक आत्मस्वरूपानें असतो १८१. या अनंत त्रिपुट्यांचा सहज व्यवहार होत असतांना, प्रत्येक क्षणीं त्यांचा काय निश्चय करावा लागतो ? १८२. दृश्य-द्रष्टा हे दोन्ही भाव, आत्मा गिळीत नाहीं. व निर्विशिष्ट भाव ओकीतहि नाहीं; पण उघडझांपीचे भाव वस्तु आपल्याच अंगावर दाखविते. १८३. डोळ्याच्या पात्याला पातें लागतांच दृश्य सृष्टि विस्ताराला पावते व तीच पातीं किंचित् उघडतांच सर्व सृष्टि मावळते, हें विशेष आहे. १८४. द्रष्टा व दृश्य यांचा ग्रास झाला असतां मध्यंतरी जी स्थिति उत्पन्न होते, त्या स्थितीसच योगभूमिका असें म्हणतात. १८५.

**उठिला तरंगु वैसे । पुढें अनुही नुमसें ।। ऐसा ठाई जैसें । पाणी होय ।। १८६ ।। कां नीद सरोनि गेली । जागृति नाहीं चेइली ।। तेव्हां होय आपुली । जेशी स्थिति ।। १८७ ।। नाना एका ठाऊनि उठी । अन्यत्र नव्हे पैठी ।। हें गमे तैसिया दृष्टी । दिठी सूता ।। १८८ ।। कां मावळो सरला दीवो । रात्रीचा न करी प्रस्तावो ।। तेणें गगनें हा भावो । वाखाणिला ।। १८९ ।। घेतला श्वासु बुडाला । घापता नाहीं उठिला ।। तैसा दोहीं शिवतला । नव्हे जो अर्थु ।। १९० ।। कीं आवावियांची करणीं । विषयार्चीं घेणीं ।। करितांचि एके क्षणीं । जें कीं आहे ।।१९१ ।। तया सारिखा ठावो । हा निकराचा आत्मभावो ।। येणें कां पाहे । न पाहों लाभे ।। १९२ ।।**

---

पाण्यावर उठलेला तरंग मावळला, पुढें दुसरा तरंग उठला नाहीं, ही पाण्याची अवस्था, १८६. किंवा निद्रा संपली, जागृति उत्पन्न झाली नाहीं अशी अवस्था, १८७. अथवा दृष्टि एका वस्तूवरून उठली, दुसऱ्या वस्तूवर गेली नाहीं, अशा मध्य संधींत असणाऱ्या दृष्टीनें जो पाहील, त्यालाच ही योग भूमिका कळेल. १८८. दिवस मावळला, रात्र पडली नाहीं अशा वेळच्या गगनाच्या स्थितीनें आम्हीं हा परमात्मभाव वर्णन केला आहे. १८९. घेतलेला श्वास बुडाला, दुसरा श्वास घेतला नाहीं, या दोन अवस्थांना न स्पर्शतां जी प्राणाची स्थिति, तशी ती स्थिति आहे, १९०. अथवा सर्व इंद्रियांकडून विषय उपभोगणें चाललें असतांहि, त्या कालीं मधली क्षणमात्र जीं अवस्था ती योगभूमिका, म्हणजे प्रमात्म्याची जी स्थिति असते ती. १९१ त्या स्थितीप्रमाणें आत्म्याचें शुद्ध स्वरूप आहे. अशा स्थितींत शुद्ध आत्म्याच्या ठिकाणीं 'पाहणें न पाहणें' प्राप्त होईल का? १९२

**काय आपुलिये भूमिके। आरसा आपुलिये निके ॥ पाहो न पाहो सके। हें कें आहे ॥ १९३ ॥ समोर पाठीमोरया। मुखें होऊं ये आरसिया ॥ वांचूनि तयाप्रति तया। होआवे कां ॥ १९४ ॥ सर्वांगें देखणा रवी। परी ऐसें घडे केवी ॥ जे उदो अस्तूची चवी। स्वयें घेपे ॥ १९५ ॥ कीं रसु आपणया पिये। कीं तोंड लपवूनि ठाये ॥ हें रसपण नव्हे। तया जैसें ॥ १९६॥ तैसें पाहणें न पाहणें। पाहणेंपणेंचि हो नेणें ॥ आणि दोनी हें येणें। स्वयेंचि असिजे ॥१९७॥ जें पाहणेंचि म्हणूनियां। पाहणें नव्हे आपणया ॥ तैं पाहणें आपसया। हाचि आहे ॥ १९८ ॥**

आपला निर्मळपणा आपल्या ठिकाणीं आरसा पाहूं शकतो किंवा पाहूं शकत नाहीं या म्हणण्यांत अर्थ काय? १९३. आरशाच्या योगानें समोर किंवा पाठमोर ही स्थिति मुखाला येते, तोच आरसा टाकला असतां मुख पाठमोरें किंवा समोर, ही स्थिति येणें शक्य आहे काय? मुख, समोरपणा व पाठमोरेपणा या विरहित स्वरूपानें असतें. १९४. सर्वांगानें सूर्य प्रकाशमान असला तरी आपल्या उदयास्ताला तो स्वतः पाहतो असें कसें घडेल? १९५. किंवा रस आपल्या स्वतःला पीत नाहीं असें म्हणावें तर रस आपलें तोंड लपवून काय एकीकडे बसतो? रस रसपणानेंच असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं हे दोन्ही भाव नाहींत. १९६. याप्रमाणें आत्मा ज्ञानस्वरूप असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं पाहाणेंपणाचा व न पाहणेंपणाचा व्यवहार नाहीं; पण तो स्वतःच दोन्ही प्रकारांत असतो. १९७. वस्तु रूप पाहणें असल्यामुळें तेथें तिचा पाहणेंपणा संभवत नाहीं, यावरून हें सहज सिद्ध होतें कीं, हा स्वतःला पाहत नाहीं १९८.

**आणि न पाहणें मा कैसें । आपणपें पाहों बैसें ॥ तरी पाहणें हें ऐसें । हाचि पुढती ॥ १९९ ॥ हें दोन्ही परस्परें । नांदती एका हारें । बांधोनि येरयेरें । नाहीं केलें ॥ २०० ॥ पाहणया पाहणें आहे । तरी न पाहणें हेंचि नव्हे ॥ म्हणोनि याची सोये । नेणती दोन्ही ॥ २०१ ॥ एवं पाहणें न पाहणें । चोरोनियां असणें ॥ ना पाहे तरी कोणें । काय पाहिलें ॥ २०२ ॥ दिसत्यानें दृश्य भासे । म्हणावेना देखिलें ऐसें ॥ तरी दृश्यास्तव दिसे । ऐसें नाहीं ॥ २०३ ॥ दृश्य कीर दृष्टीसी दिसे । परी साच कीं द्रष्टा असे ॥ आतां नाहीं तें कैसें । देखिलें होय ॥ २०४ ॥**

---

आणि द्वैताभावामुळें न पाहाणें हेंच त्याचे स्वरूप आहे, तर तो आपणां स्वतःला कसें पाहतो ? यावर उत्तर असें कीं तो नित्य ज्ञानस्वरूप आहे; म्हणून स्वतःला पाहात नाहींच. १९९. पाहणें न पाहणें हे दोन्ही भाव एका पंक्तीलाच बसतात. त्यांनीं एकमेकांस बांधून घेऊन आपापला नाश करून घेतला. २००. अथवा पाहणारा पाहणें स्वरूपच आहे म्हणून तेथें न पाहणें संभवतच नाहीं, म्हणून दोघांचा शुद्ध आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं कांहीं संबंध नाहीं. २०१. याप्रमाणें 'पाहणें व न पाहणें' या दोन्ही भावांना चोरून स्वरूप स्थिति आहे, अथवा 'पाहिलें' असें म्हटलें तरी कोणीं काय पाहिलें ? २०२. दृश्य द्रष्टयावर दिसलें तर त्यानें पाहिलें असें म्हणूं नये काय ? नाहीं. अरे, दृश्याच्या अपक्षेनें त्याला दिसतें असें नाहीं. कारण द्रष्टयाचे पाहाणें अपेक्षित नाहीं. तात्पर्य, दृश्याला द्रष्टयाहून भिन्न सत्ताच नाहीं. २०३. दृष्टीला दृश्य दिसतें असें खात्रीनें भासते मात्र, पण तसें पाहिलें तर जर द्रष्टाच असतो. दृश्य नाहीच, मग तें पाहिलें म्हणतां येईल काय ? २०४.

**मुख दिसो कां दर्पणीं । परी असणे कीं तये मुखपणीं ॥ तरी जाली तें वायाणी । प्रतीती कीं ॥ २०५ ॥ देखतांचि आपणयातें । आलिये निदेचेनि हातें ॥ तया स्वप्ना ऐसें येथें । निहाळितां ॥ २०६ ॥ निद्रिस्त सुखासनीं । वाहिजे अनुवाहणी ॥ तो साचे काय तेसणी । दशा पावे ॥ २०७ ॥ कीं सिसेवीण एकएके । दाविली राज्य करिती रंकें ॥ तैशीं तियें सतुकें । आथीं काई ॥ २०८ ॥ ते निद्रा जेव्हां नाहीं । तेव्हां जो जैसा जिये ठाईं ॥ तैसाचि स्वप्नीं कांहीं । न दाविजेचि कीं ॥ २०९ ॥ तान्हेलिया मृगतृष्णा । न भेटलिया सिणु जेसणा ॥ मा भेटलिया कोणा । काय भेटले ॥ २१० ॥ कीं साउलियेचेनि व्याजें । मेळविलें जेणें दुजें ॥ तयाचें करणें वांझें । जालें जैसें ॥२११ ॥**

मुख आरशांत दिसलें तर दिसो; पण वास्तविक तें आपल्या मुखाची होणारी प्रतीती मिथ्या ठरली. २०५. झोपेतील स्वप्नांत आपण आपणास जसे पाहतों तसें हें पाहणें आहे. २०६. आरामशीर पर्यंकावर प्रत्यक्ष निजलेल्या माणसाला स्वप्नांत ती इतरांकडून उचलून नेले असें झोपणारा पाहत असला तरी प्रत्यक्षांत तसे घडलेलें दिसतें काय ? २०७. अनेक गरिबांचें ‘ आपण राज्य करावें ’ असे मनोरथ असतात, त्यांना स्वप्नांत ‘ आपले मस्तक नसलेल्या शरीरानें राज्य करत आहे ’ असें दिसलें तर प्रत्यक्षांत तसें कधीं झालें काय ? २०८. स्वप्नांत काहींहि पाहिलें तरी प्रत्यक्ष निद्रावस्थेंत तो जशाच्या तसाच असतो. आणि निद्रा नसते तेव्हाहि तो जशाच्या तसाच असतो. २०९. तृषाकांत श्वापदाला मृगजळ दिसल्यानें धांवण्याचे फक्त श्रम घडतात. पण समजा, त्याला मृगजळ भेटलें, तरी पाणी पितां येईल काय ? २१०. एखाद्यानें आपल्या पडछायेला सोबती म्हणून जवळ केलें तर त्याचें तें कृत्य वांझेच्या कृत्याप्रमाणें फोल ठरतें. २११.

**तैसें दृश्य करूनियां। तें द्रष्टयातें द्रष्टया॥ दाऊनि घाडिलें वायां। दाविलेंपणही॥२१२॥ जें दृश्य द्रष्टाचि आहे। मा दावणें कां साहे॥न दविजे तरी नोहे। तया तो कांहीं॥२१३॥ आरिसा पा न पाहे। तरी मुखचि वायां जाये॥ तेणेंवीण आहे। आपणपें कीं॥२१४॥ तैसें आत्मयातें आत्मया। न दावीचि पैं माया॥ तरी आत्मा वावो कीं वायां। तेंचि तें कीं ना॥२१५॥ म्हणौनी आपणापें द्रष्टा। न करितां असे पैठा॥ आतां जालाचि दिठा। कां करावा॥२१६॥ नाना मागुतें दाविलें। तरी पुनरुक्त तेंचि झालें॥ येणेंही बोलें गेलें। दावणें वृथा॥२१७॥**

---

त्याप्रमाणें हें विश्वरूप दृश्य साकार करून द्रष्ट्याचा द्रष्टेपणा दाखवणें भाग पाडले व नंतर ते दृश्यहि निरर्थक ठरविलें. २१२. हें दृश्य हाहि द्रष्ट्याचा एक भाग आहे. मग तें दाखविणें कसें शक्य आहे? आणि दृश्य न दाखविलें तर मग तो द्रष्टा नाहीं असें म्हणतां येईल काय? २१३. आरशामध्यें आपलें मुख आपण पाहिलें नाहीं म्हणजे तें वायां गेलें असें होतें काय? आरसा नसला तरी मुख असतेंच ना! २१४. त्याप्रमाणें ही माया आत्म्याला आत्मा दाखवूं शकत नाहीं. मग आत्मा झूट कीं माया? तीच कीं नाहीं, २१५. म्हणून परमात्म्यानें आपल्या ठिकाणीं द्रष्टेपण येऊं न देतां, मूळच्या ठिकाणींच तो बसला आहे. तो तसा दिसला तरी मायेनें त्याला द्रष्टा कां करावें? २१६. किंवा तेंच तें पुन्हा पुन्हा दाखविलें तर त्याची पुनरुक्ति झाली असें होतें. तेंच तें बोललेलें जसें व्यर्थ जातें तसें वरचेवर सांगितलेलें दृश्यत्व आणि द्रष्टेपण निरुपाधिक ठरतें. २१७.

**दोरा सर्पाभासा । साचपणें दोरु का जैसा ॥ द्रष्टा दृश्या तैसा । द्रष्टा साचु ॥ २१८ ॥ दर्पणें आणि मुखें । मुख दिसे हें न चुके ॥ परी मुखीं मुख सतुकें । दर्पणीं नाहीं ॥ २१९ ॥ तैसें द्रष्टा दृश्या दोहो । साच कीं देखता ठावो ॥ म्हणौनी दृश्य तें वावो । देखिलें जरी ॥ २२० ॥ वावो कीर होये । तऱ्हीं दिसत तंव आहे ॥ येणें बोलें होये । आथी ऐसें ॥२२१॥ तरी आन आनातें । देखोनि होय देखतें ॥ तरी मानु येतें । देखिलें ऐसें ॥ २२२ ॥ येथें देखोनि कां न देखोनी । ऐक्य का नाना होऊनि ॥ परी हा येणें वांचूनी । देखणें असें ॥ २२३ ॥**

---

दोरीला जरी आपण सर्प मानला तरी मुळांत जशी खरोखर दोरी असते, त्याप्रमाणें जगत् आणि परमात्मा यामध्यें खरा परमात्मा आहे. २१८. आरशांत प्रतिबिंबामुळें ' पडमुख ' दिसतें. तें अगदीं मुखाबरहुकूम हें तर खरेंच. पण पडमुख हे खोटें आणि पाहणाराचें मुख हें खरें, २१९. त्याप्रमाणें द्रष्टा आणि दिसणारें आणि दृश्य या दोन्हींमध्यें द्रष्टा हाच खरा अधिष्ठान आहे, आणि दिसणारें व त्याच्यापासून झालेलें जग मिथ्या होय. २२०. दृश्य निश्चयेंकरून मिथ्या आहे, पण दिसते तर खरें; म्हणूनच दृश्य आहे असें माना. २२१. दोन मिथ्या पदार्थांत एकाने दुसऱ्यास पाहिलें म्हणून पहिला पाहाणारा द्रष्टा झाला व त्या दृश्यामुळें त्याला द्रष्टत्व आलें म्हणजे मूळचें नव्हते हे म्हणणें ओघानेंच प्राप्त आहे. २२२. अशा स्थितीला पाहो वा न पाहो, एक असो किंवा भिन्न असो, पण परमार्थतः हाच एक आहे, ह्याच्यावांचून दुसरें कांहींच नसल्यामुळें पाहणे घडेल काय ? २२३.

**आरशानें हो कां दाविलें। तऱ्ही मुखचि मुखें देखिलें ॥ तो न दावी तऱ्ही संचलें। मुखचि मुखीं ॥ २२४ ॥ तैसें दाविते नाहीं। तरी हाचि ययाच्या ठाईं ॥ ना दावी तऱ्हीही। हाचि यया ॥ २२५ ॥ जाग्रति दाविला। कां निदा हारविला ॥ परी जैसा येकिला। पुरुष पुरुषीं ॥ २२६ ॥ कां रायातें तूं रावो। ऐसा दाविजे प्रत्ययो। तऱ्ही टायेठावो। राजचि असे ॥२२७॥ नातरी रायपण राया। नाणिजे कीं प्रत्यया ॥ तऱ्ही कांहीं उणे तया। माजी असे ॥२२८॥ तैसें दावितां न दावितां। हा यया परौता ॥ चढेना तुटे आइता। असताचि असे ॥ २२९ ॥**

---

आरशानें दाखविले तरी मुखानेंच मुखाला पाहिले. आरशानें मुखाला दाखविले नाहीं तरी मुख मुखाचे ठिकाणीं एकवटलेलें आहेच. २२४. त्याप्रमाणें दृश्य संबंध नसला तरी आपल्या ठिकाणीं हा आहे, तसाच आहे. किंवा दृश्यानें दाखविला तरी पण हाच आहे. २२५. जागृतीनें दाखविला किंवा झोपेनें लपविला तरी पुरुष आपले ठिकाणीं एकटा आहे तसाच आहे २२६. अथवा राजाला 'तूं राजा आहेस' असें त्याच्या प्रत्ययास आणिले तरी (म्हटले किंवा न म्हटले) राजा आपले ठिकाणीं आहे तसा असतोच. २२७. अयवा राजाला 'तूं राजा आहेस' असें शब्दानें प्रत्ययास आणले नाहीं तरी (म्हटले नाहीं तरी) त्याच्या राजेपणास कांहीं कमीपणा येतो काय? २२८. त्याप्रमाणें हा ज्ञानानें दाखविला किंवा अज्ञानानें दाखविला तरी तो या दोन्ही भावातीत असल्यामुळें उत्कर्षास येत नाहीं व कमीहि होत नाहीं; स्वतःसिद्ध आहे तसाच आहे. २२९.

**तरी कां निमित्य पिसें । हा यया दाऊं बैसे ॥ देखते नाहीं तैं आरिसे । देखावे कोणें ॥ २३० ॥ दीपु दावीतयाते रची । की तेणेंचि सिद्धी दीपाची । तैशी सत्ता निमित्ताची । येणें साच ॥ २३१ ॥ वन्हीतें वन्ही शिखा । प्रकाशी कीर देखा ॥ परी वन्हीहूनि लेखा । येईल काई ॥ २३२ ॥ आणि निमित्त जें बोलावें । तें येणें दिसोनि दावावें ॥ देखिलें तन्ही स्वभावें । दृश्यही हा ॥ २३३ ॥ म्हणौनी स्वयंप्रकाशा यया । आपणपे देखावया ॥ निमित्त हा वांचोनियां । नाहींच मा ॥ २३४ ॥ भलतेन विन्यासें । दिसत तेणेंचि दिसे ॥ हा वांचूनि नसे । येथें कांहीं ॥ २३५ ॥**

---

अहो ! तर मग आपणास दाखवावें असें वेड काय निमित्तानें होतें ? अरे ! पहाणाराच नाहीं, मग आरशांत पहावें कोणीं ? २३०. दिवा लावणाराची सिद्धी दिव्यानें केली का लावणाऱ्यामुळेंच दिव्याची सिद्धी झाली ? त्याप्रमाणें पूर्वसिद्ध आत्मसत्ताच व्यवहाराला निमित्त आहे आणि या आत्मसत्तेनेंच व्यवहारास खरेपणा भासतो. २३१. अग्नीची ज्वाला अग्नीला प्रकाशित करिते हे निश्चित खरें आहे असें दिसतें, पण ती ज्वाला अग्नीहून भिन्न आहे असें म्हणतां येईल का ? २३२. आणि हा आत्मा दृश्य होऊन आपणांस दाखवितो, म्हणून हा निमित्त आहे असा बोलण्याचा व्यवहार होतो. आतां दृश्य काय आहे असें पाहूं जावें, तो दृश्यहि हाच. २३३. म्हणून या स्वयंप्रकाश परमात्म्याला स्वतःला पहाण्याला ह्याच्या-वांचून दुसरें निमित्त नाहीं. २३४. कोणताही विस्तार याच्याच सत्तेनें दिसतो ! याच्यावांचून दुसरें कांहींच नाहीं. २३५.

**लेणें आणि भांगारें । भांगाराचि एक स्फुरे ॥ कां जेथें दुसरें । नाहींच म्हणौनी ॥ २३६ ॥ जळतरंगीं दोन्हीं । जळावांचूनि नाहीं ॥ म्हणौनी आन कांहीं । नाहीं ना नोहे ॥ २३७ ॥ हो कां घ्राणनुमेयो । येऊं कां हातीं घेवो ॥ लाहो कां दिठी पाहो । भलतैसे ॥ २३८ ॥ परी कापुराच्या ठाई । कापुरावांचूनि नाहीं ॥ तैसा रीति भलतेययाही । हाचि यया ॥ २३९ ॥ आतां दृश्यपणें दिसो । कां द्रष्टा होऊनि असो ॥ परी हा वांचूनि अतिसो । नाहीं येथें ॥ २४० ॥ गंगा गंगापणें वाहो । कीं सिंधु होऊनि राहो ॥ परी पाणीपण नवलावो । न देखो कीं ॥ २४१ ॥ थिजावें कीं विघरावें । हें अप्रयोजक आघवें ॥ घृतपण नव्हे । अनारिसें ॥ २४२ ॥ ज्वाळा आणि वन्ही । न लेखिजति दोनी ॥ वन्हीमात्र म्हणौनी । आन नव्हे कीं ॥ २४३ ॥**

---

अलंकार व सोनें यांमध्ये एक सुवर्णच आहे. कारण सुवर्णांत दुसरें कांहींच नाहीं. २३६. जल व तरंग या दोहोंत जलावांचून कांहीं नाहीं म्हणून जल व तरंग असा भिन्न शब्दप्रयोग झाला तरी जलाव्यतिरिक्त कांहीं नाहीं व होणारहि नाहीं. २३७. नाकानें वास कळो, हाताला मऊ लागो, डोळयानें स्वच्छ दिसो; कोणत्याहि प्रकारें ज्ञान झालें तरी कापुराच्या ठिकाणीं कापुरावांचून दुसरें कांहींच नाहीं, त्याप्रमाणें कोणत्याहि प्रकारानें आत्मा दिसला तरी ह्या आत्म्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. २३८–२३९. आतां व्यवहारांत आत्मा दृश्य होऊन दिसो किंवा द्रष्टा होऊन असो, पण या दृश्यद्रष्टा व्यवहारांत आत्मव्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहींच. २४०. गंगानदी गंगारूपानें वाहो किंवा समुद्रास मिळून तद्रूपानें असो, पण पाण्याच्या दृष्टीनें त्यांत कांहींच फरक दिसत नाहीं. २४१. तुपाला घट्ट अगर पातळ असें म्हणणें निरर्थक होय, कारण दोन्ही स्थितीत तूपपणा निराळा नाहीं. २४२. ज्वाला व अग्नि हीं दोन्ही निराळीं आहेत असें म्हणता येणार नाहीं. कारण तीं दोन्ही वन्हिरूपच आहेत. २४३.

**तैसें दृश्य कां द्रष्टा । या दोन्ही दशा वांझटा ॥ पाहतां एकीकाष्ठा । स्फूर्तिमात्र तो ॥ २४४ ॥ इये स्फूर्तीकडोनी । नाहीं स्फूर्तिमात्र वांचोनी ॥ तरी काय देखोनी । देखतु असे ॥ २४५ ॥ पुढें फरकेना दिसतें । ना मागें डोकावी देखतें ॥ पाहतां येणें ययातें । स्फुरद्रूपाचि ॥ २४६ ॥ कल्लोळी जळीं घातले । सोनेंन सोनें पांघुरलें ॥ दिठीचे पाय गुंतले । दिठीसीचि ॥ २४७ ॥ श्रुतीसी मेळविली श्रुती । द्युतीसी मेळविली द्युती ॥ कां तृप्तीसी तृप्ती । वोगरिली ॥ २४८ ॥ गूळ गुळें परिवडिला । मेरु सुवर्णे मढिला । कां ज्वाळा गुंडाळिला । अनळु जैसा ॥ २४९ ॥ हें बहु काय बोलिजे । कीं नभ नभाचिये रिगे सेजे । मग कोणे निदिजे । जागे कोणे ॥ २५० ॥ हा येणे पाहिला ऐसा । कांहीं न पाहिला जैसा । आणि न पाहतांही आपैसा । पाहणेंचि हा ॥ २५१ ॥**

---

विचार करून पाहिलें तर; तो आत्मा शेवटची निष्कर्मस्थिति—स्फूर्तिमात्रच आहे. २४४. या स्फूर्तीकडून पाहिलें असतां केवळ स्फूर्तीवाचून दुसरें कांहीं नाहीं असें आहे. मग काय पाहून हा द्रष्टा होतो. २४५. दृश्य पुढें फडकत नाहीं अथवा द्रष्टा मागें डोकावीत नाहीं, याने आपल्या स्वतःस पाहिले म्हणजे तें पहाणें स्फुरद्रूपच होय. २४६. तरंग पाण्यांत बुडाले, सोन्यानें सोने पांघरले, दृष्टींचा पाय दृष्टींतच गुंतला, २४७. शब्दांत शब्द मिळवला, गंधास गंध मिळविला, किंवा तृप्तीला तृप्ती वाढली, २४८. गुळानें गुळाला माखिलें, मेरूपर्वत सोन्याने मढविला, अगर ज्याप्रमाणें अग्नि त्याच्याच ज्वाळांनीं गुंडाळला. २४९. फार काय सांगावें आकाश आकाशाच्या शय्येवर निजावयास गेले, मग निजावयाचें कोणीं व जागे रहावयाचें तरी कोणी? २५०. ह्यांचें पाहणे न पाहण्यासारखेंच आहे. कांहीं न पाहतां सहजच हा पाहणेंरूपच आहे. २५१.

येथें बोलणें न साहे । जाणणें न समाये । अनुभव न लाहे । आंगीं मिरौ ॥ २५२ ॥ म्हणौनि ययातें येणें । येपरीचें पाहणें । पाहतां कांहीं कोणे । पाहिलें नाहीं ॥ २५३ ॥ किंबहुना ऐसें आत्मेन आत्मा प्रकाशे । न चेतुचि चेऊ बैसे । तयासी तो ॥ २५४ ॥ स्वयें दर्शनाचिया सवा । अवघीयाचि जातसे फावा । परी निजात्मभवा । न मोडतांही ॥ २५५ ॥ न पाहतां आरिसा असो पाहे । तरी तेंचि पाहणें होये । आणि पाहणेन तरी ते जाये । न पाहणें पाहणें ॥ २५६ ॥ भलतैसा फाके । परी येकपणा न मुके । नाना संकोच तरी असिके । हाचि आथी ॥ २५७ ॥ सूर्याचिया हाता । अंधकारू नये सर्वथा ॥ मा प्रकाशाची कथा । आइकता कां ॥ २५८ ॥

---

बोलण्याचा परिणाम नाहीं, जगण्याचा शिरकाव नाहीं, आणि अनुभवाची प्रतिष्ठा येथें चालत नाहीं. २५२. याचें स्वतःला पाहणें विचार-दृष्टीनें पाहिलें नाहीं असें आहे. २५३. हा आत्म्याचा विलास आहे. तो जागा न होतां स्वरूपानें मूळचा जागाच आहे. २५४. स्वतः दर्शनरूप असल्यामुळें आत्मस्वरूपस्थितीवर दृश्यद्रष्टादिकांची भ्रमानें प्रतिति होत असूनहि आत्म्याचा निजात्मभाव मोडला जात नाहीं. २५५. आरसा न पाहतां मुख मुखपणानेंच असतें, आणि विशेष भावाचें पाहणें मुखेच आहे. आणि मूळ पाहण्याकडून पाहिलें तर पाहणे व न पाहणें निघून जातें. २५६. कितीहि विस्तार होऊनहि आत्म्याचा एकपणा मोडत नाहीं, त्याचा संकोच झाला तरी तो आहे तसा संपूर्ण असतोच २५७. कधींहि जाणवत नाहीं, मग तो प्रकाशाची तर वार्ता कशाला ऐकतो ? २५८.

अंधारु कां उचिवडु । हा येकला येकवडु । जैसा कां मार्तंडु । भलतेथें ॥ २५९ ॥ तैसा आवडतिये भूमिके । आरूढलीयाही कौतुकें ॥ परी ययातें हा न चुके । हाचि ऐसा ॥ २६० ॥ सिंधूचि शीव न मोडे ॥ पाणीपण सव्ह न मोडे ॥ परी मोड्डुतु कां गाडे । तरंगाची ॥ २६१ ॥ रश्मी सूर्याची आथी । परी बिंबा बाहेरी जाती । म्हणोनी बोधसंपत्ति । उपमा नोहे ॥ २६२ ॥ आणि पल्हेचा दोडा । न पाहतां तढा ॥ जग तंव कापडा । न भरेचि की ॥ २६३ ॥ सोनयाचा रवा । रवे-पणाचा ठेवा । आवघेयाची अवयवां । लेणें नव्हे ॥ २६४ ॥ न फेडितां आडवावो । दिगंतोनि दिगंता जावो । नये मा पावो । उपमा काइ ॥ २६५ ॥

---

सूर्याला अंधकार असो किंवा प्रकाश असो, सूर्य ज्याप्रमाणें वाटेल तेथें आपल्या एकरूपानें एकटा असतोच २५९. तसा कोणत्याहि त्या भूमिके-वर कौतुकानें आरुढला तरी आपल्या स्वरूपाची हानी न होतां हा असतो. २६०. जरी अनंत तरंग उत्पन्न झाले व नाश पावले तरी समुद्राची मर्यादा मोडत नाहीं व पाणीपणाचा भंग होत नाहीं. २६१. सूर्य-किरण बिंबाच्या बाहेर जातात, म्हणून सूर्याची उपमा आत्म्याला शोभत नाहीं. २६२. आणि कापसाचें बोंड फुटूनच कापूस सर्वत्र मिळतो, वस्त्रें मिळतात म्हणून बोंडातल्या कापसाची उपमा आत्म्याला देतां येत नाहीं. २६३. सोन्याच्या लगडीचा लगडपणा न मोडतां सर्व अवयवांना घालाव्यासारखे दागिने होत नाहींत. २६४. प्रतिबंध दूर केल्यावांचून एका दिशेहून दुसऱ्या दिशेला जातां येत नाहीं, मग आत्मस्वरूपाला दिशेची उपमा कशी देतां येईल ? २६५.

**म्हणोनि इये आत्मलीळे । नाहीं आन कांटाळे । आतां येयाचिये तुळे । हाचि यंया ।। २६६ ।। स्वप्रकाशाच्या घासीं । जेविता बहु वेगेंशीं । वेचेना परी कुशी । वाखही न पडे ।। २६७ ।। ऐसा निरुपमा परी । आपुलिये विलासवरी । आत्मा राणीव करी । आपुले ठाईं ।। २६८ ।। तयातें म्हणिपे अज्ञान । तरी न्याया भरलें रान ।। आतां म्हणे तयाचें वचन । उपवावो हो आम्ही ।। २६९ ।। प्रकाशितें अज्ञान । ऐसें म्हणणेंहन । तरी निधि दावितें अंजन । म्हाणिजे काई ।।२७०।। सुवर्णगौर अंबिका । न म्हणिजे काय काळिका । तैसा आत्मप्रकाशका । अज्ञानवादु ।। २७१ ।। येऱ्हवी शिवोनि पृथ्वीवरी । तत्त्वाच्या वानेपरी । जयाच्या रश्मिकरीं । उजाळा येती ।। २७२ ।।**

म्हणून या आत्मविलासाला वजन करण्यास दुसरा कांटा नाहीं. म्हणून याचें वजन करण्यास हाच ! २६६. स्वप्रकाशाचें घांस लवकर लवकर घेतो, पण नवल हें आहे कीं, अन्न संपत नाहीं व कुशीला खळगीहि पडत नाहीं. ( पोट न भरलेलें दिसत नाहीं. ) २६७. अशा निरुपम रीतीनें आपल्या विलासानें सर्व सत्ता चालवितो. अशा प्रकारच्या आत्म-विलासाला ' अज्ञान ' म्हणावें तर न्याय देशोधडीला लागला असें म्हटलें पाहिजे; २६८. इतक्यावरहि ' अज्ञान आहे ' असें म्हणणाऱ्याचें बोलणें स्वस्थ ऐकून घ्यावें हेंच बरें ! २६९. जमिनीखालचें द्रव्य प्रकाश करणाऱ्याला जर तूं अज्ञान असें म्हणावें जमिनीखालचें द्रव्य दाखविणाऱ्या अंजनाला ' काजळ ' म्हणत नाहींत काय ? २७०. उत्तम सोन्याच्या केलेल्या देवीला काळी म्हणत नाहींत का ? त्याप्रमाणें स्वयंप्रकाश आत्म्याला ' अज्ञान ' म्हणणे हा केवळ शाब्दिक भेद आहे. २७१. ईश्वरापासून पृथ्वीच्या परमाणूपर्यंत जो अनंत तत्त्वाचा प्रकार दिसतो. तो सर्व ज्याच्या प्रकाशानें प्रकाशित केला जातो, २७२.

जेणें ज्ञान सज्ञान होये । दृङ्मात्र दृष्टीतें विये । प्रकाशाचा दिवो पाहे । प्रकाशाची ॥ २७३ ॥ तें कोणें निकृष्टें । दाविलें अज्ञानाचेनि बोटें । ना तमें सूर्या मोटे । बांधितां निकें ॥२७४॥ अपूर्व अज्ञानाक्षरीं । बसतां अज्ञानाची थोरी ॥ शब्दार्थाची उजरी । अपूर्व नव्हे कीं ॥ २७५ ॥ लाखेचें मांदुसें । आगीचें ठेवणें कायसें ॥ आंतुबाहेरी सरिसें । करूनि घाली ॥ २७६ ॥ म्हणोनी जग ज्ञानें स्फिते । बोलतां अज्ञानवादातें ॥ विखुरली होती आते । वाचेच्चिये ॥ २७७ ॥

ज्याच्या योगानें व्यावहारिक ज्ञानाला ज्ञानत्व येतें, सर्वत्र त्रिपुटी ज्ञानच बनतें, प्रकाशाला प्रकाशपणा ज्यामुळें येतो, २७३. येथपर्यंत प्रतिपादन केलेल्या ज्ञानरूप आत्म्याला कोणी अविचारी मनुष्य अज्ञानाच्या बोटानें दाखवील म्हणजे आत्म्याला अज्ञान असें म्हणेल तर, 'सूर्याला अंधाराच्या मोटेंत बांधलें आहे,' या म्हणण्याप्रमाणें त्याचें बोलणें असंबद्ध होईल. २७४. ज्ञानाची एवढी मोठी थोरवी असूनहि त्या ज्ञान शब्दाच्या मागें 'अ' अक्षर लावून त्याला 'अज्ञान' हें नांव ठेवण्यांत शाब्दिक कसरत विशेष नाहीं काय? २७५. लवकर जळणाऱ्या लाखेच्या पेटींत अग्नि घालून ती ठेविली तर उपयोग काय? कारण आंत ठेविलेला अग्नि लाखेला अंतर्बाह्य अग्निरूप करून टाकील. २७६. म्हणून ज्ञानानें दुमदुमून भरलेल्या जगाला अज्ञान म्हणणें म्हणजे वाणीला फांटा फुटल्याप्रमाणें आहे. २७७.

**अखरी तब गोवधु । पुढारा अमृत बाधु ॥ मा कैसा अज्ञान-वादु । कीजे-ज्ञानीं ॥ २७८ ॥ आणि अज्ञान म्हणणें । स्फुरतसे अर्थपणें ॥ आतां हेंचि ज्ञान कोणें । मानिजेना ॥ २७९ ॥ असो हें आत्मराजें । आपणापें जेणें तेजें ॥ आपणचि देखिजे । बहुयेपरी ॥ २८० ॥ निर्वचिता जें झावळे । तेचि कीं लाहे डोळे ॥ डोळयापुढें मिळे । तेंचि तया ॥ २८१ ॥ ऐसें जगज्ञान जें आहे । तें अज्ञान म्हणे मी वियें ॥ येणें अनुमानें हो पाहे । आथी ऐसें ॥ २८२ ॥ तंव अज्ञान त्रिशुद्धी नाहीं । हें जगोंचि ठेविलें ठाईं ॥ जे धर्म धर्मित्व केहीं ॥ ज्ञानाज्ञान असे ॥ २८३ ॥ काजळा मोती विये । राखोंडिया दिपु जिये ॥ तरी ज्ञान धर्म होये । अज्ञानचा ॥ २८४ ॥**

---

'गोवध' हीं अक्षरें उच्चारण्याचा एक दोष, आणि गोवध न करतां गाय मारली असें आहे खोटें बोलण्याचा दुसरा दोष येतात, असें आहे. म्हणून ज्ञानस्वरूपालाच, 'अज्ञान' कसें म्हणावें ? 'अज्ञान' नाहींच, तें आहे असें म्हणणें हा एक दोष, व आत्मा आहे 'तो आहे' असें म्हगणें हा दुसरा दोष. २७८. आतां अज्ञान म्हणण्यांतच वस्तुतः ज्ञानाचें ग्रहण होते. मग आत्म्यालाच ज्ञान म्हणणें योग्य आहे, असें कोणालाहि कबूल करावें लागणार नाहीं का ? २७९. हा आत्मराजा आपल्याच तेजानें आपल्यालाच अनंत प्रकारें बघतो. २८०. विचाराच्यापुढें न टिकतां डोळ्यांना कसें प्राप्त होणार ? जें असतें तेंच डोळ्यांना दिसतें. २८१. अज्ञान म्हणते कीं 'जग असें जें ज्ञान' तें माझ्यापासून उत्पन्न होतें या अनुमानावरून अज्ञान आहे हें पटते. २८२. खात्रीपूर्वक सांगतां येईल कीं अज्ञान नाहींच. कारण सर्व जगांत ज्ञानच भरलेलें आहे, म्हणून ज्ञान व अज्ञान यांमध्यें धर्मधर्मिस्वाभाव कसा येऊं शकेल ? २८३. मोतीं काय पाण्याला उत्पन्न करितें ? राखेनें दीप पेटवितां येईल काय ? या गोष्टी जर संभवतील, तर ज्ञान अज्ञानाचा धर्म होईल ! २८४.

**चंद्रमा निगती ज्वाळा । आकाश आते शिळा ॥ तरी अज्ञान उजळा । ज्ञानातें वमी ॥ २८५ ॥ क्षीराब्धिकाळकूट । हें एके परीचें विकट ॥ काळकूटीं चोखट । सुधा कैंची ॥ २८६ ॥ ना ज्ञानीं अज्ञान जालें । तें होतांचि अज्ञान गेलें ॥ पुढती ज्ञान एकलें । अज्ञान नाहीं ॥ २८७ ॥ म्हणोनि सूर्य सूर्याचियेवढा । चंद्र चंद्राचि सांगडा ॥ ना दीपाचिया पडिपाडा । ऐसा दीपू ॥ २८८ ॥ प्रकाशु तो प्रकाशकी । यासी न वंचे घेई चुकीं ॥ म्हणोनि जग असिकी । वस्तुप्रभा ॥ २८९ ॥ विभाति यस्य भासा । सर्वमिदं हा ऐसा ॥ श्रुति काय वायसा । ढेकर देती ॥ २९० ॥ यालागीं वस्तुप्रभा । वस्तूचि पावे शोभा ॥ जातसे लाभा । वस्तूसिचि ॥ २९१ ॥**

---

चंद्रापासून ज्वाला निघतात काय ? आकाशांतून कधीं तरीं दगडांची दृष्टि होते काय ? अरे ! असें जर होईल तर शुद्ध ज्ञानाला अज्ञान उत्पन्न करतें असें आम्ही म्हणूं. २८५. क्षीराब्धींतून काळकूट निघालें, हें सुद्धां एक विपरीतच आहे, पण काळकूटांतून शुद्ध अमृत कधीं तरी निघेल का ? २८६. अथवा ज्ञानापासून अज्ञान उत्पन्न झालें, तें उत्पन्न झाल्याबरोबर त्यानें अज्ञानाचा नाश केला, मग आतां अज्ञान नसून एकटें ज्ञानच शिल्लक राहिलें. २८७. म्हणून सूर्याला उपमा सूर्याचीच, चंद्र चंद्राच्याच सारखा, अथवा दिव्याच्या योग्यतेला दिवाच. २८८. प्रकाश तो प्रकाशच, असें म्हणण्यांत कांहीं चूक नाहीं असें समज. म्हणून सर्व जग वस्तुप्रभाच आहे. २८९. हें सर्व जग ज्या आत्म्याच्या प्रकाशानें भासतें, असें श्रुति सांगते. शंका फिटून; खात्रीनें ती तृप्त होऊन असें ती सांगते ती काय पोकळ बडबड आहे थोडीच ? २९०. म्हणून वस्तूची शोभा वस्तूलाच, प्रभेची शोभा वस्तूलाच मिळते, व प्रभेचा लाभहि वस्तूलाच होतो. २९१.

**वांचूनि वस्तु इया । आपणापें प्रकाशावया ॥ अज्ञान हेतु वायां । अवघेंचि ॥ २९२ ॥ म्हणोनी अज्ञान सद्भावो । कोणे-परी न लाहो ॥ अज्ञान कीर वावो । पाहों ठेलियाही ॥ २९३ ॥ परी तमाचा विसुरा । न जोडेचि दिनकरा ॥ रात्रीचिया घरा । गेलियाही ॥ २९४ ॥ कां नीद खोळे भरितां । जाणणेंही नये हाता । येकलिया टळटाळिता । ठाकिजे जेवीं ॥ ॰९५ ॥**

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृतार्थविवरणे अज्ञानखंडन नाम सप्तमप्रकरणं संपूर्णम्**

---

हें वगळून स्वतःचा प्रकाश करण्यास वस्तूला अज्ञान कारण आहे, हें सर्व म्हणणें निराधार आहे. २९२. म्हणून अज्ञानाची सिद्धि कोणत्याहि प्रकारानें होत नाहीं; निश्चयेंकरून पाहावयास गेलें असतांहि अज्ञान खोटें ठरलें. २९३ रात्रींच्या घरीं गेलें असतांहि सूर्याला अंधाराची प्रतिति होत नाहीं. २९४. झोंप पदरांत भरावयास गेलें असतां झोळींत जगणेंहि शिल्लक राहत नाहीं. तिला धरूं पाहाणारा मात्र रात्रभर हिंडत बसतो झालें! २९५. याप्रमाणें अमृतानुभव ग्रंथांतील अज्ञानखंडण नामक सातवें प्रकरण समाप्त.

**प्रकरण सातवें समाप्त**

# प्रकरण आठवें

तैसें आमुचेनि नांवें । अज्ञानाचें ज्ञानही नव्हे ॥ आम्हांलागीं गुरुदेवें । आम्हीच केलों ॥ १ ॥ परी आम्हां आम्ही आहों । तें कसें पाहों जावों ॥ तंव काय कीजे ठावो । लाजिजे ऐसा ॥ २ ॥ हा ठावोवरी गुरुरायें । नांदविलों उवायें ॥ जे आम्ही न समाये । आम्हांमाजी ॥ ३ ॥ अहो आत्मपणीं न संटो । स्वसंविती न घसवटो ॥ आंगीं लागलें न फुटो । कैवल्यही ॥ ४ ॥ आमुची करवे गोठी । ते जालीचि नाहीं वाक्सृष्टी ॥ आमुतें देखो दिठी । ते दिठीच नव्हे ॥ ५ ॥ आमुतें करूनि विखो । भोगूं शके पारखो ॥ तैं आमुतें न देखो । आम्हींपण ॥ ६ ॥ प्रकटो लपो न लाहो । येथें नाहीं नवलाहो ॥ परी कैसेनीही विपावो । असणेयाचा ॥ ७ ॥

---

अरे ! आमचें स्वतःचें नांव पाहिल्यावर अज्ञानाविषयीं ज्ञान राहत नाहीं श्रीसद्गुरुरायांनीं आम्हाला या स्थितीला आणलें. १. पण आमचे आम्ही तरी कसे आहोंत. हें पाहावयाचें म्हटलें, तर लाज वाटते. २. इतक्या वरच्या स्थितीला श्रीगुरूनीं नेलें कीं, मी माझ्यातच मावत नाहीं. ३. त्या ठिकाणीं आत्मभाव सांपडत नाहीं. आपलेपणाच्या ज्ञानाचे संस्कार नाहींत. मोक्ष हा मूर्तिमंत शरीरस्थ असल्यानें त्याचें वेगळेपण टिकत नाहीं. ४. या रीतीचें वर्णन करण्यासाठीं बळ या शब्दविश्वांतच नाहीं. साध्या डोळ्याला बघतां येईल अशी दृष्टीच निर्माण झालेली नाहीं. ५. या स्थितीला दृश्य समजून ती कोणाला पाहू शकेल ? आमचा आम्हीपणा आम्हीहि पाहूं शकत नाहीं. ६. प्रकट व्हावें किंवा लपावें, असें घडूं शकत नाहीं असें म्हणण्यांत आश्चर्य नाहीं. कांहीं केलें तरी या स्थितीचें ज्ञान होत नाहीं. ७.

**किंबहुना श्रीनिवृत्ति । ठेविलों असो जये स्थिती ॥ ते काय देऊं हातीं । वाचेचिया ॥ ८ ॥ तेथें समोर व्हावया । अज्ञानाचा पाडु कासया ॥ केउतें मेलिया माया । होऊं पाहिजे ॥ ९ ॥ अज्ञानाचा प्रवर्तु ॥ नाहीं जया गांवाआंतु ॥ तेथें ज्ञानाची तऱ्ही मातु । कोण जाणे ॥ १० ॥ रात्री म्हणोनि दीवे । पडती कीं लावावे ॥ वांचूनि सूर्यासवें । सिणणें होये ॥ ११ ॥ म्हणोनी अज्ञान नाहीं । तेथेंचि गेलें ज्ञानही ॥ आतां निमिषोन्मेषा दोहीं । ठेली वाट ॥ १२ ॥ येऱ्हवीं तऱ्ही ज्ञान अज्ञानें । दोहींचीं अभिधानें ॥ अर्थाचेनि आनानें । विप्लाविलीं ॥ १३ ॥ जैशीं दंपत्तें परस्परें । तोडूनि पालिटिली शिरें ॥ तेथें पालटु ना पण सरे । दोहींचें जिणे ॥ १४ ॥**

---

श्रीगुरूंनीं ज्या स्थितींत ठेवलें तिचें मीसुद्धां शब्दांनीं वर्णन करूं शकत नाहीं. ८. अशा या तिच्यासमोर यावयास बिचारें अज्ञान तर कसें बरें समर्थ असेल ? अज्ञान हें मेल्यावर, माया उत्पन्न होईल कशी ? ९. या स्थितीत अज्ञानाचा प्रवेशच होत नाहीं आणि ज्ञानासंबंधी तरी काय सांगता येईल ? १०. रात्र आहे म्हणून दिवे लावावे लागतात, पण उजाडल्यार दिवे लावण्याची कटकट कोण करील ? ११. अज्ञान नाहींसें झालें त्याच्या सापेक्षेनें असणारें ज्ञानहि गेलें. आतां ज्ञानाज्ञान या दोघांची वाट बंद झाली. १२. मुलतः ज्ञान व अज्ञान हीं दोन्ही नांवें अर्थभेदानें विस्तारलीं आहेत. १३. अदलाबदल करायची म्हणून नवराबायको यांनीं आपापलीं मस्तकें तोडलीं; पण अदलाबदल कांहीं झाली नाहीं, उलट दोघे जिवाला मुकले. १४.

कां पाठी लाविला होये । तो दीपूचि वाया जाये ॥ दिठी आंधारें पाहे । तैं तेंचि वृथा ॥ १५ ॥ तैसें निपटूनि जें नेणिजे तें अज्ञान शब्दें बोलिजे ॥ आतां सर्वही जेणें सुजे । तें अज्ञान कैसें ॥१६॥ ऐसें ज्ञान अज्ञान आले । अज्ञान ज्ञानें गेलें ॥ हें दोन्ही वांझौलें । दोनीं झालीं ॥१७॥ आणि जाणें तोचि नेणे । नेणे तोचि जाणे ॥ आतां कें असणें जिणें । ज्ञाना अज्ञाना ॥ १८ ॥ एवं ज्ञानाज्ञान दोन्ही । षोटीं सूनि अहनी ॥ उदेला चिद्गगनीं ॥ चिदादित्यु हा ॥ १९ ॥

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते ज्ञानखंडनं नाम अष्टप्रकरणं संपूर्णम्**

---

बसणाऱ्याच्या पाठीमागें लावलेला दिवा जसा निरुपयोगी होतो; तेज अंधाराला पाहिल तर तें तेज कसें म्हणावें? १५. आतां ज्याच्या योगानें सर्व जाणलें जातें त्याला अज्ञान असें कसें म्हणता येईल? १६. ज्ञान येऊन अज्ञानाच्या ठिकाणीं अज्ञानाचा नाश तर झालाच व दोन्हींहि मिथ्या ठरलीं १७. जो जाणतो तोच नेणतो व तोच यथार्थ जाणतो. म्हणून ज्ञानाज्ञानांनीं कोठें जावें? १८. या प्रकारें ज्ञानाज्ञानाहे दिवस व रात्र त्यांत हा ज्ञानरूपी नभःप्रांगणांत उदय पावला आहे. १९. याप्रमाणें श्रीअमृतानुभव ग्रंथांतील ज्ञानखंडननामक आठवें प्रकरण समाप्त.

**प्रकरण आठवें समाप्त**

# प्रकरण नववें

आतां अमोद सुनास जाले । श्रुतीस श्रवण रिघाले ।। आरिसे उठिले । लोचनेसी ।। १ ।। आपुलेनि समीरपणें । वेल्हावती विंजणें ।। कीं माथेची चापेपणें । बहकताती ।। २ ।। जिव्हा लोधली रसें । कमळ सूर्यपणें विकाशे ।। चकोरेंचि जैसें । चंद्रमा जालीं ।। ३ ।। फुलेंचि जालीं भ्रमर । तरुणीच जाले नर ।। जालें आपुलें शेजार । निद्राळूचि ।। ४ ।। दिठीवियाचा रवा । नागरु इया ठेवा ।। घडिला कां कोरिवा । परी जैसा ।। ५ ।। तैसें भोग्य आणि भोक्ता । दिसे आणि देखता ।। हें सरलें अद्वैता । अफुटामाजीं ।। ६ ।। सेवतेपणा बाहेरी । न निगतांचि परी ।। पाती सहस्रवरी । उपलविजे ।। ७ ।। तैसें नवानवा अनुभवीं । वाजतां वाधावी ।। अक्रियेच्या गांवीं । नेणिजे ते ।। ८ ।।

---

आतां स्वतः सुवास नाक झाला, शब्द कर्ण झाले आणि आरसे नेत्र झाले. १. वारा स्वतः पंखा बनून वारा घेतों, किंवा मस्तकेंच फुलें बनून भूषवितात. २. रसना रस बनली, कमळ सूर्य झालें व चकोर चंद्र झाले. ३. फुलें भुंगे झाले, तरुणी पुरुष झाले, झोंपाळू मनुष्य निद्रेचें ठिकाण झाला. ४. आंब्याच्या झाडाचे कोवळे अंकुर कोकीळ बनले, मलयपर्वता-वरील सुवासिक वारा देहधारी झाला, रस स्वतः भोक्ते बनले. ५. घडण आणि कोरीव काम केलें कीं जसें नीटनेटकें सुंदर दिसतें; ६. त्याप्रमाणें उपभोग्य वस्तु आणि भोक्ता, द्रष्टा आणि दृश्य, हे सारें ब्रह्मांत एकरस झाले. ७. शेवंतीच्या अनेक पाकळ्या असल्या तरी त्या शेवंतीपणा टाकीत नसतात. ८.

म्हणोनि विषयाचोनि नांवें । सूनि इंद्रियांचे थवे ॥ सैंघ घेती धावें । समोरही ॥ ९ ॥ परी अरिसा सिवेसिवे । तव दिठीसी दिठी फावे ॥ तैसें जालें धांवे । वृत्तिचिया ॥१०॥ नाग मुदी कंकण । त्रिलिंगी भेदली खूण ॥ घेतां तरी सुवर्ण । घेईजे कीं ॥११॥ वेंचूनि आणूं कल्लोळ । म्हणोनी घापे करतळ ॥ तेथें तरी निखळ । पाणीच फावे ॥ १२ ॥ हातापाशीं स्पर्शु । डोळ्यापाशीं रूपसु ॥ जिभेपाशीं मिठांशु । कोण्ही एकु ॥१३॥ तऱ्ही परिमळ परौतें । मिरवणें नाहीं कापुरातें ॥ तैसें बहुता-परी स्फुरतें । तेंचि स्फुरे ॥ १४ ॥ म्हणौनी शब्दादि पदार्थ । श्रोत्रादिकांचे हात ॥ घ्यावया जेथें । उजू होती ॥ १५ ॥ तेथें संबंधु होय न हाये । तंव इंद्रियांचें तें नोहे ॥ मग असताचि आहे । संबंधू ना ॥ १६ ॥

---

त्याप्रमाणें नवा नवा भोक्तृ व भोग्य व्यवहार झाला तरी अक्रिय परमात्मा ब्रह्मवेत्त्याचें राहण्याचें ठिकाण असल्यामुळें वेगळा असा एकहि व्यवहार तत्त्वतः घडत नाहीं. ९. म्हणून सर्व इंद्रियसमुदाय आपआपल्या विषयावर तुटून पडत असतांहि १०. ज्याप्रमाणें दृष्टी आरशाला पहातांच मागें फिरून, ती दृष्टी दृष्टीलाच पाहते, त्याप्रमाणें वृत्तीचा हा विषयग्रहणाचा व्यवहार आहे. ११. नाग, मुदी व कंकण यांच्यात नामरूपभेद दिसला तरी हातांत सोनेंच येतें. १२. पाण्यावरील तरंग वेंचून आणावे म्हणून हात घालावा तों शुद्ध पाणीच मिळतें. १३. हाताला मऊ स्पर्श, डोळ्याला रूप व जिभेला मधुर स्वाद लागतो. १४. पण कापुराच्या ठिकाणीं एका सुगंधावाचून दुसरें कांहीं नाहीं, त्याप्रमाणें सर्व प्रकारच्या भानामध्यें मूळ ज्ञानरूप परमात्माच तितक्या स्फुरणरूपानें आहे. १५. असा मुख्य भेद वेदान्तसिद्धान्त असल्यामुळें शब्दादि पांच विषय उपभोगण्यासाठीं श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियें होतात. १६.

जियें पेरीं दिसती उसीं । तिये लामती कीं रसीं ।। कांति जेवीं शशी । पुनवेचिया ।। १७ ।। पडिलें चंदावरी चांदिणें । समुद्रीं जालें वरखणें ।। विषया करणें । भेटती तैशीं ।। १८ ।। म्हणोनी तोंडाआड पडे । तेंही वाचा वावडे ।। परी समाधी न मोडे । मौनमुद्रेची ।। १९ ।। व्यापाराचे गाडे । मोडतांही आपाडे ।। अक्रियेचें न मोडे । पाऊल केंही ।।२०।। पसरूनि वृत्तीची वावे । दिठी रूपातें दे खेवे ।। परी साचाचोनि नांवें । कांहींच नलगे ।। २१ ।। तमातें ध्यावया । उचलूनि सहस्र बाहिया ।। शेवटी रवी यया । हाचि जैसा ।।२२ ।। स्वप्नींचिया विलासा । भेटईन या आशा ।। उठिला तंव जैसा । तोचि मा तो ।। २३ ।।

---

इंद्रियांचा होण्याचा व्यवहार व संबंध नाहींसा होतो, पण या साऱ्यांमध्यें नित्य असणारा परमात्मा असतो. १७. किंवा पौर्णिमेच्या चंद्रांत ज्याप्रमाणें सर्व एका उसांत जेवढीं पेरी असतात, तेवढीं सर्व रसभरित होतात किंवा पौर्णिमेच्या चंद्रात ज्याप्रमाणें सर्व कला एकवटतात, १८. चंद्रावर चांदणें पडलें किंवा समुद्रावर पाऊस पडला तरी ते सागरजल होतें, त्याच न्यायानें इंद्रियांस विषय मिळून त्यांनीं अभोग घेतल्याचें दिसलें तरी, पारमार्थिक दृष्टया कांहींच व्यवहार होत नाहीं. १९. तोंडास येईऊ तसें वाणी जरी बोलली, तरी तें बोलणाऱ्या ज्ञान्याची मौनमुद्रारूप समाधि भंगत नाहीं. म्हणजे वास्तविक ज्ञात्यानें कांहीं बोललेंच नसतें. २०. ज्ञात्याच्या हातून अनेक व्यवहार झाले असें स्थूल दृष्टीला दिसलें तरी त्याच्या आकर्तेपणास बाध येत नाहीं. २१. तसेंच दृष्टि, वृत्तीचे हात पसरून रूपविषयाला आलिंगन देण्यास गेली तरी वास्तविक पाहतां कोणताहि व्यवहार घडत नाहीं. २२. हजारों किरणें उभारून सूर्य अंधकारास भेटायला गेला असतां, शेवटीं त्याचा तोच जसा शिल्लक राहातो. २३.

**तैसा उदैलियानि विषयें। ज्ञानी विषयी हों लाहे ॥ तंव दोन्ही न होनी होये। काय नेणों ॥ २४ ॥ चंद्र वेंचूं गेला चांदिणें। तंव वेंचिलें काय कोणें ॥ विऊनि वांझे स्मरणें। होती जैशीं ॥ २५ ॥ प्रत्यहारादि आंगीं। योगें आंग टेकिलें योगीं ॥ तों जाला ये मार्गी। दिहाचा चांदु ॥ २६ ॥ येथें प्रवृत्ति बहुडे जिणें। अप्रवृत्तिसी वाधावणें ॥ आतां प्रत्यङ्मुखपणें। प्रचारु दिसे ॥ २७ ॥ द्वैतदशेचें आंगण। अद्वैत वोळगे आपण ॥ भेदू तंव तंव दुण। अभेदासी ॥ २८ ॥ कैवल्याही चढावा। करित विषयसेवा ॥ जाला भृत्यु भज्य कालोवा। भक्तीच्या घरीं ॥ २९ ॥ घरामाजी पायें। चालतां मार्गूही तोचि होये ॥ ना बैसे तऱ्ही आहे। पावणेंची ॥ ३० ॥**

स्वप्नांतील स्त्रीला भेटण्याच्या इच्छेनें पुरुष जागा झाला तोच तो जसा आपला आपणच असतो. २४. त्याप्रमाणें निर्विषय आत्मभाव उपजल्यावर तत्त्ववेत्ता विषयी होतो काय ? भावातीत असा ज्ञानी कोणत्या स्थितींत असतो हें सांगतां येण्यापलीकडचें आहे. अरे ! चांदणें वेंचण्यास चंद्र गेला असतां तेथें कोणीं काय वेंचलें ? केवळ मनोरथ वायां जातात. २५.-२६. प्रत्याहार वगैरे अष्टांगयोग सहजस्थितीनें ब्रह्म जाणणारापुढे नसले त्यांनीं हात टेकले. अष्टांगादि योग या ब्रह्मवेत्त्यापुढे दिवसाच्या चंद्राप्रमाणें फिका पडतो. २७. या सहजस्थितींनें प्रवृत्तीचें जगणें संपतें, अप्रवृत्तीला शोभा येते, अशा स्थितींत ब्रह्मवेत्त्याचें सर्व आचरण अंतर्मुख असतें. २८. हें अद्वैत, द्वैताच्या अंगणांत स्वतःचाकरी करतें, म्हणजे त्याची अद्वैतस्थिति कायम असते. म्हणून जों जों भेद जास्त तों तों अभेदाचीच वाढ होते. २९. या अद्वैतस्थितींत असणाऱ्या पुरुषाचें विषयसेवन मोक्षाच्यावरहि चढाई करितें, अभेद भक्तीच्या मंदिरांत देव व भक्त यांचें ऐक्य होतें. ३०.

**तैसें भलतें करितां । येथें पाविजे कांहीं आतां ॥ ऐसें नाहीं न करितां । ठाकिजेना ॥ ३१ ॥ आठवू आणि विसरू ॥ तयातेंही घेऊं नेदी पसरु ॥ दशेचा व्यवहारु । असाधारणु ॥ ३२ ॥ जाली स्वेच्छाची विधि । स्वैर जाली समाधी ॥ दशे इये मोक्षरिद्धि । बैसों घापे ॥ ३३ ॥ जाला देवोचि भक्तु । ठावोचि जाला पंथु ॥ होऊनि ठेला येकांतु । विश्वचि हें ॥ ३४ ॥ भलतेउतेन देवें । भलतेन भक्त होआवें ॥ बैसला तेथें राणिवे । अकर्मू हो ॥ ३५ ॥ देवाचिया दाटणी । देऊळा जाली आटणी ॥ देश-कालादि वाहणी । येईचिना ॥ ३६ ॥ देवीं देवोचि न माये । मा देवी कें अन्वयो आहे ॥ तेथें परिवारु बहुये । ऊघडता कीं ॥ ३७ ॥ ऐसाही स्वामीभृत्युसमंधा । लागीं उठली श्रद्धा ॥ ते देवोचि नुसधा । कामविजे ॥ ३८ ॥**

असें पाहा कीं, घरांत पावलें टाकीत असतां मार्गही घरच, अथवा बसला तरी प्राप्यस्थानहि घरच, दोन्ही एकच. ३१. याप्रमाणें ज्ञानवान् वाटेल तें करीत असतां त्यास नवीन कांहीं मिळवायचें नसतें किंवा करीत नसता तरी सर्व कांहीं त्यानें मिळविलेलें असतेंच. ३२. आत्मस्वरूपाची आठवण अथवा विसर या दोघांचाहि विस्तार ह्या स्थितीत नसतो. ३३. जे करावेसें वाटेल तोच विधि, जें आचरण घडेल तीच समाधि, मोक्षाचें ऐश्वर्य या दशेची बैठक आहे. ३४. अशा ऐक्य स्थितींत देवच भक्त झाला, प्राप्त स्थितींत मार्ग झाला, विश्वच एकांत होतो. ३५. वाटेल त्यानें देव व्हावें व वाटेल त्यानें भक्त व्हावें, अशा रीतीनें हा नैष्कर्म्य झालेला पुरुष जेथें बसेल तेथें ऐश्वर्याच्या राज्यावरच राज्य करतो. ३६. देवाच्या विस्तारानें देऊळ झाकून गेलें. चिन्मात्र वस्तूला देशकालादि व्यवहार नाहीं. ३७. देवतांच देव मानत नाहीं, मग तेथें देवीचा प्रवेश कोठून होणार? तेथें कोणताहि विचित्र परिवार जुळत नाहीं. ३८.

**अवघियाचि उपचारा। जपध्यान निर्धारा॥ नाहीं आन संसारा। देवेवांचुनी॥ ३९॥ आतां देवातेंचि देवें। देववरी भजावें॥ अर्पणाचेनि नांवें। भलतिया॥ ४०॥ देव देऊळ परिवारु। कीजे कोरूनि डोंगरु॥ तैसा भक्तीचा वेव्हारु। कां न व्हावा॥ ४१॥ पाहे पां अवघेया। रूखा रूखचि यया॥ परी दुसरा नाहीं तया। विस्तारु जेवीं॥ ४२॥ अहो मुगी मुग जैसें। घेतां न घेतां नवल नसें॥ केलें देवपण तैसें। दोहींपरी॥ ४३॥ अखताचि देवता। अखतीचि असे न पूजितां॥ मा अखती काय आतां। पूजों जावों॥ ४४॥ दीपीची लुगडीं। दीपकळिके तूं वेढीं॥ हें न म्हणतां ते उघडी। ठाके काई॥ ४५॥**

---

अशा वेळीं देव आणि भक्त संबंधाची श्रद्धा उपजल्यावर, तो देवच एकटा एक आहे असें समजावें. ३९. मग जप, ध्यान, निर्धार यासारखे सर्व उपचार हे या संसारांत परमात्म्याशिवाय दुसरे तिसरे कांहीं नाहींत. ४०. अशा स्थितींत मग देव हा देव, भक्त हा देव, पूजासाहित्य हें देव. असें झाल्यावर अर्पणाच्या वेळीं देवानें देव पूजला असें विचित्र होतें. ४१. देव, देऊळ आणि देवाचा सर्व परिवार हें जसें डोंगरांत कोरून काढावें, त्याप्रमाणें एका भक्तीमुळें वरील ओवींत सर्व प्रकार कां घडूं नयेत? ४२. वृक्ष हा सर्वांगीं एकच असतांना तो मूळ, बुंधा, शाखा, पानें, फळें या प्रकारांनीं वाढतो. ४३. मुक्यानें मुकेपणाचें नाटक वठविलें आणि न वठविलें यांत आश्चर्य कसलें? त्याप्रमाणें या ठिकाणीं पूजा केली आणि न केली तरी फरक होत नाहीं. सर्व एकच. ४४. कुंकुवानें लाल केलेल्या अक्षतांवर देवांना ठेवतात. पुनः त्याच अक्षता देवांना वाहतात. अशा वेळीं कोण कशाची पूजा करतो बरें? ४५.

**कां चंद्रातें चंद्रिका । न म्हणिजे तूं ले का ॥ तऱ्ही तो असिका । तियाचि कीं ना ॥४६॥ आगीपणें आगी । असतचि असे आंगीं । मा कासयालागीं । देणें न देणें ॥ ४७॥ म्हणौनी भजतां भजावें । मा न भजतां काय नव्हे ॥ ऐसें नाहीं स्वभावें । श्रीशिवूचि असे ॥ ४८ ॥ आतां भक्ति अभक्ति । जालें ताट एकी पांती । कर्माकर्मांचिया वाती । माल्हवूनियां ॥ ४९ ॥ म्हणवूनि उपनिषदें । दशे येती निंदे ॥ निंदाचि विशदें । स्तोत्रें होती ॥ ५० ॥ नातरी निंदास्तुति । दोन्ही मौनासाठीं जाती ॥ मौनीं मौन आथी । बोलतां बोली ॥५१॥ घालितां अव्हासव्हा पाये । शिवयात्रा होत जाये ॥ शिवा गेलियाही नोहे । केही जाणें ॥ ५२ ॥**

---

ज्योतीला जर सांगितलें कीं, 'बाई, तूं उघडी आहेस तर ही प्रकाशरूपी लुगडी नेस!' आणि असें तिला म्हटलें नाहीं तरी ती तशीच राहील काय? ४६. 'तूं मला घे' असें चांदण्यानें चंद्राला सांगितलें नाहीं; तरी त्या चंद्रात तें असतेच कीं नाहीं? ४७. अग्नींत उष्णता हा नैसर्गिक धर्म आहे. तो कांहीं द्यावा घ्यावा लागतो? ४८. म्हणून भक्तानें भजन करावें, भजन न केलें तर कांहीं नाहीं; तो परमात्मरूप असतोच. ४९. विहित कर्मे यांच्या वाती मालवून भक्ति आणि अभक्ति या एकाच पंक्तीला एकाच ताटांत बसतात. ५०. सर्वांना ठाऊक असलेलाच परमात्मा उपनिषदांनीं सांगितला असल्यानें निंदा होते; पण परमात्म्याचें तें सत्य स्वरूप सांगितल्यानें तीं स्तोत्रें बनलीं आहेत. ५१. आत्मा मौनरूप असून निंदा आणि स्तुति या दोन्ही स्तब्ध राहिल्या, दोन्ही कांहीं बोलल्या किंवा न बोलल्या तरी परमात्मा मौनरूपच आहे. ५२.

चालणें आणि बैसक । दोन्ही मिळूनि एक ।। नोहे ऐसें कौतुक । इये ठाईं ।। ५३ ।। येऱ्हवीं अडोळिलिया डोळा । शिवदर्शनाचा सोहळा ।। भोगिजे भलते व्हेळा । भलतेणें ।।५४।। ना समोर दिसे शिव ही । परी देखिलें कांहीं नाहीं ।। देवा भक्ता दोही । एकाचि पाडू ।। ५५ ।। आपणाचि चेंडू सुटे । मग आपणया उपटे ।। तेणें उंदळला दाटे । आपणपांचि ।। ५६ ।। ऐशी जरी चेंडूफळी । देखिजे कां केव्हेळी ।। तरी बोलिजे सरळी । प्रबुद्धाची ।। ५७ ।। कर्माचा हातु न लगे । ज्ञानाचें कांहीं न रिगे ।। ऐसीच होतसे आंगें । उपास्ती हे ।। ५८ ।। निफजे ना निमे । आंगीं आंग घुमे ।। सुखा सुख उपमे । देवचेल इया ।। ५९ ।। कोण्ही एक अकात्रिम । भक्तीचें हें वर्म ।। योगज्ञानादिविश्राम-। भूमिका हे ।। ६० ।।

---

कोठेंहि पायधूळ झाडली तरी शिवयात्रा घडते खरी; पण यात्रेला गेला. तरी त्याचें जाणें न जाण्यासारखें हो. ५३. हें त्याचें गमन किंवा ठायींच 'बैसोनि निवांत' या दोन्ही आपणांपुरत्या वेगवेगळ्या क्रिया असल्या तरी त्याच्यापुरत्या त्या एकच असतात; हें आश्चर्य होय. ५४. आपल्या चर्मचचक्षूंनीं देवदर्शनाचा आनंद केव्हांहि माणसाला आटापिटा न करितां घेतां येतो. तो प्रत्यक्ष पुढें उभा राहून देवदर्शन घेत असला तरी, त्यानें कांहीं पाहिलें नाहीं, कारण तो देव आणि भक्त हे एकच असतात. आपण भिंतीवर आपटण्यासाठीं चेंडू टाकला कीं, जणू काय तो स्वतःच उसळी मारतो, आपणच आदळतो आणि आपला आपणच परत पूर्वस्थळीं येतो. ५६-५७. पोरांचा हा खेळ थोरांच्या चष्म्यांतून पाहिल्यावर सरळ दिसतो. ५८. अशा पूर्णावस्थेप्रत कर्माचा हात पोंचत नाहीं. ज्ञान तेथें प्रवेश करूं शकत नाहीं, आणि उपासना ही आपली आपणच होत असते. ५९. त्याच्या ठिकाणीं ही उत्पन्न होत नाहीं किंवा नष्ट होत नाहीं. ती आपल्याच ठिकाणीं दंग असते. अशा प्रकारच्या सुखाला सुखाची उपमा दिली आहे. ६०.

**आंगें कीर एक जाहले । परी नामरूपाचे मासले ॥ होते ते ही आटले । हरि हर येथें ॥ ६१ ॥ अहो अर्धनारीनटेश्वरें । गिळित गिळित परस्परें । ग्रहण जालें एकसरें । सर्वग्रासें ॥ ६२ ॥ वाच्यजात खाउनी । वाचकत्वही गिळूनि ॥ ठाकिली निदैजौनी । परा येथें ॥ ६३ ॥ शिवाशिवा समर्था स्वामी । येवढीये आनंदभूमि ॥ घेपे दीजे एकें आम्ही । ऐसें केलें ॥६४॥ चेतचि मा चेवविलें । निदैलोंचि मा निदविलें ॥ आम्हांच आम्हां आणिलें । नवल जी तुझें ॥६५॥ आम्ही निखळ मा तुझे । वरी लोभें म्हणसी माझे ॥ हें पुनरुक्त साजे । तूंचि म्हणोनी ॥६६॥ कोणाचें कांहीं नेघसी । आपुलेंही तैसाचि नेदिसी ॥ कोण जाणे भोगसी । गौरव कैसें ॥ ६७ ॥**

---

असें हें भक्तीचें स्वाभाविक मर्म आहे. योग, आदिंचें विश्राम स्थळ ही आत्मस्थितीच आहे. ६१. शंकर आणि विष्णु यांचे आत्मस्वरूप मूळ एक पण नांवें, रूप भिन्न होत. पण तेहि येथें नाहींसे होतात. ६२. अर्धनारी-नटेश्वरांनीं परस्परांना गिळलें आहे आणि अशा रीतीनें गिळीत असतांना शेवटच्या वेळीं उभयतांचें ग्रहण झालें. ६३. शब्दांनीं जें उल्लेखिले जाते व शब्दविश्व यांना खाऊनपिऊन टाकून परा हा वाचेचा प्रकार स्तब्ध राहिला. ६४. हे सद्गुरुनाथा ! तुम्ही परमश्रेष्ठ कल्याण आहांत. एवढ्या या आनंदभूमीवर व्यवहारासाटीं योग्य, असे आम्हांला आपण तयार केलेत. ६५ जणूं काय जागृतींत आपण जागे केलेंत किंवा झोपणारांना झोपविलेत. याप्रमाणें आपण आम्हांला घडविले, अशी आपली किमया आहे. ६६. आम्ही तर तुझेच आहोंत आणि वरतीं तूं पुन्हा आपल्या लोभामुळें ' हे आमचे आहेत ' असे म्हणतोस ही पुनरुक्ति तुझी लखलाभ असो. ६७.

गुरुत्वें जेवढा चांगू । तेव्हढाचि तारूनि लघू । गुरुलघु जाणे जो पांगू । तुझा करी ॥ ६८ ॥ शिष्या देतां वाटे । अद्वैताचा समो फुटे ॥ तरी काह्या होती भाटें । शास्त्रें तुझीं ॥ ६९ ॥ किंबहु ये दातारा । मी तूं याचा संसारा ॥ वेंचूनि होसी सोयरा । तेणेंचि तोषें ॥ ७० ॥

इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते जीवन्मुक्तदशा-
कथनं नाम नवमप्रकरणं संपूर्णम् ।

---

तूं कोणाचे कांहीं घेत नाहींस, कोणाला कांहीं देत नाहींस. मात्र तुझा जो गौरव होत आहे, तो तूं कसा भोगतोस हें समजत नाहीं. ६८. गुरुपणामुळें जसे श्रेष्ठ आहांत, तेवढेच आपण तरून नेण्यास हलकेहि आहांत. आपल्याबद्दलचा हा भेद समजावून देणे हेंहि आपल्याच हातीं आहे. ६९. या शिष्याला अद्वैताचे ज्ञान दिल्याने, आपल्या स्वरूपाच्या एकत्वांत कांहीं उणें पडेल, असे कां वाटतें? नाहीं तर शास्त्रांनीं तुझी भाटगिरी कां पत्करली असती? ७०. फार काय सांगूं? हे सद्‌गुरु निवृत्तिराया! संसार आणि माझेतुझेपणा नाहींसा केला असल्याने तूं माझा सोयरा झाला आहेस आणि त्यामुळें मी आनंदच झालों आहें. ७१. याप्रमाणे श्रीअनुभवामृत-ग्रंथांतील जीवन्मुक्तदशाकथन नांवाचे नववें प्रकरण संपूर्ण झाले.

**प्रकरण नववे समाप्त**

# प्रकरण दहावें

परी गा निवृत्तिराया । हातातळीं सुखविलें तुया ।। परी निवांतचि मियां । भोगावें कीं तें ।। १ ।। परी महेशें सूर्या-हातीं । दिधली तेजाची सूती ।। तया भासा अंतर्वर्ती । जगचि केलें ।। २ ।। चंद्रासी अमृत घातलें । तें तयाचि काई येतुलें ।। कीं सिंधु मेघा दिधलें । मेघाचि भागू ।। ३ ।। दिवा जो उजिडावडु । तो घराचाचि सुरवाडु ।। गगनीं आथी पवाडु । तो चाचि कीं ।। ४ ।। अगाधे ही उचंबळती । ते चंद्रीची ना शक्ति ।। वसंत करी तैं होती । झाडाचे दानीं ।।५।। म्हणोनी हें असंवर्य । हें दैवीकीचें औदार्य ।। वांचूनि स्वातंतर्य । माझें नाहीं ।। ६ ।।

---

माझ्या मस्तकावर हात ठेवून, अहो निवृत्तिराया ! आपण मला सुखी केलें आणि तें सुख मी निवांत भोगावें; १. परंतु ईश्वराने सूर्याच्या हातांत तेजाचे सूत्र दिलें त्याच्या प्रकाशाने सर्व जगाला प्रकाश मिळाला. २. चंद्राला अमृत दिलें तें त्याच्या एकटया पुरतें आहे काय ? किंवा समुद्राने मेघांना पाणी दिलें तें त्याच्याच पुरतें काय ? ३. दिव्याचा प्रकाश दिव्या-पुरताच नसून, तो सर्व घराला प्रकाश देतो; आकाशाचा अवकाश त्याच्यापुरता नसून सर्व जगाला त्याचा उपयोग होतो. ४. अफाट अस-णाऱ्या समुद्रास भरती येते. ही शक्ति चंद्राची नव्हे काय ? वसंतऋतूच्या सामर्थ्यानें झाडें हीं पुष्पफलादि दानसमर्थ होतात. ५. म्हणून अहो गुरुराया ! हें आपल्या दैवी संपत्तीचे अफाट औदार्य आहे. यावांचून हें प्रतिपादन करण्याचे माझे स्वतंत्र सामर्थ्य नाहीं. ६.

**आणि हा येवढा ऐसा । परिहार देऊं कायसा ।। प्रभुप्रभाव-विन्यासा । आड ठाउनी ।। ७ ।। आम्ही बोलिलों जें कांहीं । तें प्रगटेचि असे ठाईं ।। मा स्वयंप्रकाशा काई । प्रकाशावें बोलें ।।८।। नाना विपायें आम्हीं हन । कीजे तें पां मौन ।। तरी काय जनीं जन । दिसतेना ।। ९ ।। जनातें जनें देखतां । द्रष्टेचि दृश्य तत्त्वतां । कोण्ही नहोनी आइता । सिद्धांतचि हा ।। १० ।। यया परौतें कांहीं । संवित रहस्य नाहीं । आणि हें तया आधींही । असतचि असे ।। ११ ।। तऱ्ही ग्रंथ प्रस्तावो । न घडे हें म्हणे वावो ।। तरी सिद्धानुवाद लाहो । आवडी करूं ।। १२ ।। पढियंते सदा तेचि । परी भोगी नवी नवी रुची ।। म्हणोनी हा उचीतचि अनुवाद सिद्ध ।। १३ ।।**

---

एवढा हा परिहार मी कशाला करूं ? कारण या म्हणण्यांतच गुरूंच्या सामर्थ्यास कमीपणा येतो. ७. आम्ही ज्याचें प्रतिपादन केलें तो आत्मा आपल्या ठिकाणीं प्रकट आहेच. मग स्वयंप्रकाशाला शब्दानें प्रकाशित करावें लागतें काय ? ८. किंवा आम्ही कदाचित् मौन धरलें असतें तर जनानें जनाला काय पाहिलें नसतें ? ९. जनांनीं जनाला पाहिलें असतां वास्तविक ज्ञानरूप परमात्माच दृश्य बनलेला आहे. परमात्मा कांहीं एक न होऊन आयता स्वयंसिद्धच आहे. १०. आतांपर्यंत प्रतिपादन केलेल्या ज्ञानरूप आत्म्याचें या पलीकडे रहस्य नाहीं व तें रहस्य या माझ्या वर्णनानें सिद्ध झालें असेंहि नाहीं. कारण प्रतिपादन करण्याचें पूर्वीं तें आहे तसेंच आहे. ११. तर मग आतां ग्रंथारंभ घडत नाहीं असें कदाचित कोणी म्हणेल तर, जें सिद्ध आहे त्याचाच अनुवाद, आवडीच्या भरांत आम्हीं केला हेंच त्याचें उत्तर. १२. आवडती वस्तु तीच असली तरी तिचा भोग घेण्यांत नवी नवी रुचि उत्पन्न होते, हें लोकानुभवावरून सिद्ध आहे. याच न्यायानें, शुद्ध परमात्मस्वरूपविषयक अनुवाद आम्हीं केला हे योग्यच आहे. १३.

**याकारणें मिवा । गौप्य दाविलें बोलोनियां ।। ऐसें नाहीं अपैसया । प्रकाशूचि ।। १४ ।। आणि पूर्ण अहंता वेठलों । सैंध आम्हीच दाटलों ।। मा लोपलों ना प्रगटलों । कोण्हा होउनी ।। १५ ।। आपणया आपणपें । निरूपण काय वोपे ।। मा उगेपणें हारपे । ऐसें आहे ।।१६।। म्हणोनी माझी वैखरी । मौनाचेही मौन करी ।। हें पाणियावरी मकरी । रेखिलिया ।। १७ ।। एवं दशोपनिषदें । पुढारी न ढळती पदें ।। देखोनी बुडी बोधें । येथेंचि दिधली ।। १८ ।। ज्ञानदेव म्हणे श्रीमंत । हें अनुभवामृत ।। सेवूनि जीवन्मुक्त । हेंचि होतु ।। १९ ।। मुक्ति कीर वेल्हाळ । अनुभवामृत निखिळ ।। परी अमृताही उठी लाळ । अमृतें येणें ।। २० ।।**

---

या कारणास्तव आम्ही पूर्ण स्थितीला गुप्त बोलून दाखविली, पूर्ण स्थितीला गुप्त वस्तु बोलून दाखविली असें नाहीं, ती सहज उघडीच आहे. १४. आणि आम्हीं पूर्ण स्थितीला प्राप्त झालों सर्वत्र आमचीच व्याप्ति झाली म्हणून कोणाच्याहि अपेक्षेनें आम्ही लोपलों नाहीं, वा प्रकटलोंहि नाहीं. १५. आपलें निरूपण आपल्याला अर्पण करण्यात विशेष काय आहे ? म्हणून स्वस्थ बसल्यानें हानी होते असें आहे काय ? १६. म्हणून माझ्या वैखरीवाणीनें मौनाचेंहि मौन केलें. करणें म्हणजे पाण्यावर माशाचें चित्र काढण्याप्रमाणें आहे. १७. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात–आम्ही सांगितल्यापेक्षां दशोपनिषदांत जास्त कांहीं सांगितलें नाहीं असें पाहून आत्मबोधानें येथेंच बुडी मारली. १८. या श्रीमंत अनुभवामृत पानानें जीवन्मुख अमृतरूपच होवोत ! १९. मुक्ति चांगली खरी, पण अनुभवामृत अत्यत शुद्ध आहे, यास्तव अनुभवामृताला पाहून या मुक्तिरूप अमृतालाहि लाळ घोटावी लागते. २०.

**नित्य चांदू होये । परी पुनवे आनु आहे ॥ हें का मी म्हणूं लाहें । सूर्यदिठी ॥२१॥ प्रिया सावाइले होये । तें आंगीचें आंगीं न समाये । येऱ्हवीं तेथेंचि आहे । तारुण्य कीं ॥ २२ ॥ वसंताचा आला । फळीं फुलीं आपुला । गगनाचिया डाळा । पेलती झाडें ॥२३॥ ययालागीं हें बोलणें अनुभवामृतपणें । स्वानुभूति परगुणें । वोगरिलें ॥ २४ ॥ आणि मुक्त मुमुक्षु बद्ध । हे तववरी योग्यताभेद । अनुभवामृत स्वाद । विरुद्ध जंव ॥२५॥ गंगावगहना आलीं । पाणियें गंग जालीं । कां तिमिरें भेटलीं । सूर्या जैसीं ॥ २६ ॥ नाहीं परिसाची कसवटी । तववरि वानियाच्या गोष्टी । मग पंधरावीयाच्या पाठीं । बैसावें कीं ॥ २७ ॥**

---

नित्य चंद्र आहे हें खरें, पण पौर्णिमेच्या चंद्राची गोष्ट कांहीं वेगळीच आहे हे म्हणणें लोकदृष्टीनें ठीक आहे, पण सूर्यदृष्टी जो मी, त्यानें असें कां म्हणावें ? २१. स्त्रीच्या अंगांत येरव्हीं तारुण्य साहजिकच असतें, पण प्रियासमागम होतांच तें अंगांतील तारुण्य अंगांतच मावत नाहीं. २२. वसंत ऋतु प्राप्त झाला म्हणजे झाडें आपल्या फळांनीं व फुलांनीं गगन-चुंबित होऊन डोलतात. २३. याकरितां आमच्या अनुभवरूप पक्कान्नाची मेजवानी, अनुभवामृत बोलण्यानें संतांना केली. २४ आमच्या अनुभवा-मृताचा स्वाद लाभला नाहीं तोपर्यंत मुक्त मुमुक्षू, बद्ध असा अधिकार-भेद असतो. २५. गंगेला मिळावयास गेलेलीं उदकें गंगारूपच होतात, किंवा अंधकार सूर्याला भेटावयास गेला असतां, सूर्यरूपच होतो. २६. परिसाचा स्पर्श झाला नाहीं तोपर्यंत सोनें उत्तम व कमी कसाचें आहे असें बोलावें; पण परिसाची कसोटी प्राप्त झाल्यावर सर्व कस पंधराच्या दराचे म्हणजे उत्तम सोन्याचेंच लागतात. २७.

**तैसें जें या अक्षरा । भेटती गाभारा । ते ओघ जैसे सागरा । आंतु आले ॥२८॥ जैशा अकारादि अक्षरा । भेटती पन्नासही मात्रा । तैसें या चराचरा । दुसरें नाहीं ॥ २९ ॥ तैसें तियें ईश्वरीं । आंगोळी नुभेचि दुसरी । किंबहुना सरोभरी । श्रीशिवेंशीचि ॥ ३० ॥ म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे ॥ अनुभवामृतें येणें ॥सणु भोगिजे सणे । विश्वाचेनि ॥ ३१ ॥**

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते ग्रंथमहिमावर्णनंनाम दशमप्रकरणं संपूर्णम् ।**

---

**श्रीकृष्णार्पणमस्तु । शुभं भवतु ॥**

---

त्याप्रमाणें गुरुकृपेनें या ग्रंथांतील अक्षराचा अनुभव लक्षांत येतो तेव्हां, ज्याप्रमाणें ओघ समुद्राला मिळाल्यावर समुद्ररूप होतात, त्याप्रमाणें तो पुरुष अमृतरूप–मोक्षरूपच होतो. २८. किंवा पन्नास वर्ण ओंकाररूप आहेत म्हणजे त्या सर्व वर्णात अकार, उकार, मकार, रूपानें ओंकाराचीच व्याप्ति आहे, तसें सर्व चराचर विश्व ब्रह्मरूप आहे, दुसरें कांहीं नाहीं. २९. त्याप्रमाणें परमात्मस्वरूपाच्याकडे अंगुलिनिर्देश करून ‘ एवढा, तेवढा, असा, तसा ’ असें सांगून उपयोग नाहीं. सारें त्रिभुवन केवल शिवरूपच आहे. ३०. हा अमृतानुभवरूप आनंद सर्व विश्वानें उपभोगावा, असें ज्ञानेश्वरमहाराज आग्रहानें प्रतिपादन करतात. ३१.

याप्रमाणें अनुभवामृतग्रंथांतील ग्रंथपरिहारनामक प्रकरण दहावें समाप्त.

**प्रकरण दहावें समाप्त.**

॥ ॐ **तत्सत्** ॥



एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे। दोन्ही डोळस आरिसे।
परस्पर पाहता कैसें। मुकले भेदा!॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत

# श्रीचांगदेवपासष्टी

**स्वति श्रीवटेशु । जो लपोनि जगदाभासु । दावी मग ग्रासु । प्रगटला करी ॥ १ ॥ प्रगटे तंव न दिसे । लपे तंव तंव आभासे । प्रगट ना लपाला असे । न खोमता जो ॥ २ ॥ बहु जंव जंव होये । तंव तंव कांहींच न होये । कांहीं नहोनि आहे । अव-घाचि जो ॥ ३ ॥ सोनें सोनेंपणा उणें । न येतांचि झालें लेणें । तेंवि न वेंचतां जग होणें । अंगें जया ॥ ४ ॥ कल्लोळ कंचुक । न फेडितां उघडें उदक । तेंवी जगेंसी सम्यक् । स्वरूप जो ॥ ५ ॥**

---

हे श्रीवटेश चांगदेवा ! तुझें कल्याण असो. स्वतः परमात्मा गुप्त राहून या जगताचा आभास दाखवितो. तो प्रकट होतो तेव्हां जगाचा भास नाहींसा करतो. १. परमात्म्याचें स्वरूप जेव्हां दिसत नाहीं तेव्हां जग-ताची जाणीव होते. तो जेव्हां प्रकटतो तेव्हां दिसतोच असें नाहीं. विचा-रान्तीं असें दिसेल कीं, परमेश्वर दिसतहि नाहीं किंवा गुप्तहि होत नाहीं. हें दोन्ही गुणधर्म त्याला स्पर्श करतात असें मुळींच नाहीं. २. स्वरूपानें परमात्मा विशाल होत असतां भासमान् जगत् नाहींसें होत जातें. वास्त-विक परमात्म्यानें कांहीं जगाचें रूप घेतलेलें नसून सगळीकडे तोच पूर्ण-पणें व्यापलेला आहे. ३. सुवर्णाचे दागिने घडवितात, परंतु त्यामुळें त्याच्या सोनेपणांत मुळींच उणीव निर्माण होत नाहीं. हें जसें आहे, त्याप्रमाणें स्वतः परमात्मा विविध आकारांनीं, रूपांनीं नटला तरी त्याच्या मूळ परमात्मास्वरूपांत कांहींहि कमीपणा येत नाहीं. ४ पाण्यावर अनेक लाटा उठत असतात. त्यामुळें तें पाणी लाटांच्या आवरणानें झाकलें आहे असें वाटतें. तरीहि तें संपूर्णतया पाणीच असतें; तसेंच परमात्मा आणि जगत् यांच्या बाबतीत आहे. परब्रह्म व विश्व यांत कांहींहि फरक नाहीं. ५.

**परमाणूंचिया मांदिया । पृथ्वीपणें न वचेचि वाया । तेंवि विश्वस्फूर्ति इयां । झांकवेना जो ॥ ६ ॥ कळांचेनि पांघुरणें । चंद्रमा हरपों नेणें । का वन्ही दीपपणें । आन नोहे ॥ ७ ॥ म्हणोनि अविद्यानिमित्तें । दृश्य द्रष्टत्व वर्ते । तें मी नेणें आइतें । ऐसेंचि असे ॥ ८ ॥ जेंवि नाममात्र लुगडें । येऱ्हवी सूतचि तें उघडें । कां मातीं मृद्भांडें । जयापरी ॥ ९ ॥ तेंवि द्रष्टा दृश्य दशे । अतीत दृङ्मात्र जें असे । तेंचि द्रष्टादृश्यामिसें । केवळ होय ॥ १० ॥ अलंकार येणें नामें । असिजे निखिल हेमें । नाना अवयवसंभ्रमें । अवयविया जेंवि ॥ ११ ॥ तेंवि शिवोनि पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी । प्रकाशे तें एकसरी । संवित्ति हे ॥ १२ ॥**

पृथ्वीवर अनेक लहान लहान कण—अणुपरमाणु आहेत. परमाणु हे पृथ्वीच्या रूपानें आहेत म्हणून कांहीं पृथ्वीचा पृथ्वीपणा नाहींसा होत नाहीं. त्याच अर्थानें विश्वाच्या आविष्कारामुळें परमात्मा मुळींच झाकला जात नाहीं ६. कल्पना केली कीं चंद्रावर त्याच्या सोळा कळांचें आच्छादन घातलें आहे तरीहि, चंद्राचा निश्चित लोप होत नाहीं. दिव्याच्या रूपानें अग्नि दिसला तरी तो अग्निच असतो. ७. ( म्हणून म्हणतों चांगदेवा ! तुला ) अज्ञानामुळें ( अविद्येनें ) ज्ञानरूपी आत्मा हा वेगळेपणानें दृश्य आहे. आणि मी द्रष्टा वेगळा आहे असें भासतें. परंतु मला मात्र वेगळेपणाची जाणीव नाहीं. ८. वस्त्रापैकीं एखाद्या वस्त्राला लोक लुगडें म्हणतात. तरीहि लुगडें ज्या सुताचें विणलेलें असतें त्याचें सूतरूप कायमच असतें. माती आणि मातीचें भांडें यांच्या बाबतींत असेंच सांगता येईल. ९. (म्हणून म्हणतो) द्रष्टा म्हणजे पाहणारा आणि दृश्य म्हणजे जें पाहावयाचें तें अशा दोन्हीं-च्याहि पलीकडे परमात्मतत्त्व ज्ञानस्वरूप असें आहे. हेच द्रष्टा आणि दृश्य या प्रकारांनीं अनुभवाला येतें. १०. अलंकाररूपानें जसें केवळ सुवर्णच असतें किंवा अनेक अवयवांच्या रूपानें अवयवीच असतो. ११. ईश्वरापासून पाषाणापर्यंत नाना प्रकारें पदार्थांची प्रतीति करून देणारें एक ज्ञानच असतें, म्हणजे त्या त्या आकारानें ज्ञानच परिणाम पावलेलें असतें. १२.

**नाहीं तें चित्र दाविती । परी असे केवळ भिंती । प्रकाशे ते संविति । जगदाकारें ॥ १३ ॥ बांधियाचिया मोडी । बांधा नहोनि गुळाची गोडी । तयापरी जगपरवडी । संवित्ति जाण । ॥ १४ ॥ घाडियेचेनि आकारें । प्रकाशिजे जेविं अंबरें तेविं विश्वस्फूर्ति स्फुरे । स्फूर्तिचि हे ॥ १५॥ न लिंपतां सुखदुःख । येणें आकारें क्षोभोनि नावेक । होय आपणिया सन्मुख । आपणचि जो ॥ १६ ॥ तया नांव दृश्याचें होणें । संवित्ति दृष्टृत्वा आणिजे तेणें । बिंबा बिंबत्व जालेपणें । प्रतिबिंबाचेनि॥१७॥ तेंवि आपणचि आपुला पोटीं । आपणया दृश्य दावित उठी । द्रष्टादृश्यदर्शनत्रिपुटी । मांडे तें हे ॥ १८ ॥**

---

भिंतीवर चित्रें दिसलीं तरी त्या चित्ररूपानें वास्तविक भिंतीचीच प्रतीति असते, त्याप्रमाणें जगदाकारानें ज्ञानाची म्हणजे परमात्म्याचीच प्रतीति असते. १३. गुळाची ढेप केल्यानें गोडीला ढेपेचा आकार येत नाहीं, अगर ढेप मोडल्यानें गोडी मोडतहि नाहीं, त्याप्रमाणें जगतांत अनंत प्रकारें द्वैतप्रतीति झाली तरी ती परमात्म्याचीच प्रतीति आहे; द्वैत नाहींच. १४. घडीच्या आकारांत ज्याप्रमाणें वस्त्र स्पष्ट व्हावें, त्याप्रमाणें परमात्माच (स्फूर्ति) विश्वादिरूपानें स्फुरत असतो. १५. अविद्येच्या निमित्तानें अविद्या काली क्षणमात्र दृष्टि किंवा दृश्य आकारांत अनुभवाला येणारा परमात्मा त्या आकाराच्या सुखदुःखानें सुखी किंवा दुःखी होत नाहीं. तो स्वतःच द्रष्टा किंवा दृश्य रूपांत असतो. १६. आरशांतील प्रतिबिंबामुळें बघणाऱ्या तोंडाला बिंबत्व भाव येतो, या प्रकाराचें अविद्या ज्ञानरूप परमात्म्यास द्रष्टृत्व भावाला आणते! १७. असें असलें तरी द्रष्टा, दृश्य इत्यादि भावांचा अनुभव परमात्म्यावरच येतो. याचाच अर्थ असा कीं स्वतः परमात्माच द्रष्टा, दृश्य आणि दर्शन या त्रिपुटींच्या रूपानें व्यवहार करतो. १८.

**सुताचिये गुंजे। आंतबाहेर नाहीं दुजें। तेवीं तिनपणेंविण जाणिजे। त्रिपुठी हे ॥ १९ ॥ नुसधें मुख जैसें। देखिजतसें दर्पणमिसें। वायांचि देखणें ऐसें। गमों लागे ॥ २० ॥ तैसें न वचतां भेदा। संवित्ति गमे त्रिधा। हेंचि जाणे प्रसिद्धा। उपपत्ति इया ॥ २१ ॥ दृश्याचा जो उभारा। तेंचि दृष्टत्व होय संसारा। या दोहीं माजिला अंतरा। दृष्टि पंगु होय ॥ २२ ॥ दृश्य जेधवां नाहीं। तेधवां दृष्टि घेऊनि असे काई? आणि दृश्येंविण कांहीं। द्रष्टत्व असे? ॥ २३ ॥ म्हणोनि दृश्याचे जालेपणें। दृष्टि द्रष्टत्व होणें। पुढती तें गेलिया जाणें। तैसेंचि दोन्ही ॥ २४ ॥**

---

सुताच्या गुंजेमध्यें सुतावांचून दुसरें कांहीं नाहीं, त्याप्रमाणें परमात्म-स्वरूपावर द्रष्टा, दृश्य, दर्शन अशा त्रिपुटीचा व्यवहार झाला तरी, एका परमात्म्याच्या ठिकाणीं भिन्न भाव उत्पन्न न होतां, तीनपणांवाचून त्रिपुटी असते. १९. केवळ मानेवरचें तोंड आरशाच्या उपाधीनें स्वतः आपल्यासच पाहतें, त्याप्रमाणें अविद्योपाधीनें दृश्यद्रष्टादि भावाची प्रतीति येते असें वाटतें. २०. वरील उदाहरणांत संवित्ति (परमात्मा) त्याच्या स्वरूपात भेद न होतां अविद्योपाधीनें द्रष्टा, दृश्य, दर्शन असा भेद झालासा दिसतो. तत्त्वतः तो भेद नसतोच. चांगदेवा, हीच अखंड अभेदाविषयीं उपपत्ति, समज. २१. अविद्येच्या योगानें दृश्याचा होणारा अविर्भाव द्रष्टृत्वाच्या व्यवहाराला हेतु होतो. पारमार्थिक दृष्टीनें द्रष्टा व दृश्यातील भेद पाहिल्यास विचार (ज्ञान) पांगळा होतो; म्हणजे नाहींसा होतो. २२. जेव्हां दृश्य नाहींच असें ठरतें तेव्हां त्याला प्रकाशित करणारें ज्ञान कोणाला प्रकाशित करील? दृश्यावांचून द्रष्टत्व कोठें तरी असतें का? तात्पर्य, अध्यात्मज्ञानाच्या उदय-कालीं द्रष्टा व दृश्य व दर्शन ही त्रिपुटी मावळते. २३. दृश्य तयार झालें म्हणजे, दर्शन आणि द्रष्टत्व हीं असतात. जर विचारानें दृश्यत्वच नष्ट झालें, तर द्रष्टा व दृष्टि या दोहोंचाहि अभाव होतो. २४.

**एवं एकाचि झाली ती होती। तिन्ही गेलिया एकाचि व्यक्ति। तरी तिन्ही भ्रांति। एकपण साच ॥ २५ ॥ दर्पणाच्या आधि शेखीं। मुख असतचि असे मुखीं। माजी दर्पण अवलोकीं। आन कांहीं होये? ॥ २६ ॥ पुढें देखिजे तेणें बगें। देखतें ऐसें गमों लागे। परी दृष्टीतें वाउगें। झकावित असे ॥२७॥ म्हणोनि दृश्याचिये वेळे। दृश्यद्रष्टत्वावेगळें। वस्तुमात्र निहाळे। आपणापाशीं ॥ २८ ॥ वाद्यजातेंविण ध्वनी। काष्ठजातेंविण वन्ही। तैसें विशेष ग्रासुनी। स्वयेंचि असे ॥ २९ ॥ जें म्हणतां नये कांहीं। जाणों नये कैसेंही। असताचि असे पाहीं। असणें जया ॥३०॥**

याप्रमाणें अविद्येच्या निमित्तानें एकाच परमात्म्याचीं द्रष्टादर्शनादि तीन रूपें होतात. विचारजागृतीनें त्या तिघांचाहि नाश होतो व एक परमात्माच राहतो. २५. आरसा आणण्याच्या पूर्वीं किंवा आरसा नेल्यावरहि, मुख जागेवर मुखपणानेंच असतें, पण त्यावेळीं आरशांत पाहतांना त्याचा कांहीं निराळेपणा होतो काय? २६. आरशांत आपलें मुख आपणच पाहतों. दृष्टीनें मूळ मुखाला द्रष्टेपणा आला असें वाटतें, पण असें वाटणें म्हणजे ज्ञानाची फसवणूकच होय. २७. म्हणून दृश्याच्या कालांतहि दृश्यत्व, द्रष्टृत्व, या धर्माहून भिन्न असणारी परमात्मवस्तु आपणच आहों असा निश्चय कर. २८. चांगदेवा! वाद्यांतून निघणाऱ्या ध्वनीच्या आधीं सामान्य ध्वनि हा असतोच, किंवा लाकडांत अनुभवायला मिळणाऱ्या स्पष्ट अग्नीच्या पूर्वीं सामान्य अग्नि असतोच, त्याप्रमाणें दृश्यादि विशेष भाव नष्ट झाले तरी त्यांना आश्रयभूत ब्रह्मवस्तु असतेच. २९. ज्या वस्तूचें अशी तशी, येवढी तेवढी, इत्यादि शब्दानें वर्णन करतां येत नाहीं, ती ज्ञानाचा विषय होत नाहीं. अशी ती परमात्मवस्तु आहे. ३०.

**आपुलिया बुबुळा । दृष्टि असोनि अक्षम डोळा । तैसा आत्मज्ञानीं दुबळा । ज्ञानरूप जो ।। ३१ ।। जें जाणणेंचि कीं ठाईं । नेणणें कीर नाहीं । परी जाणणें म्हणोनियांही । जाणणें कैचें ! ।। ३२ ।। यालागीं मौनेंचि बोलिजे । कांहीं नहोनि सर्व होइजे । नव्हतां लाहिजे । कांहींच नाहीं ।।३३।। नाना बोधाचिये सोयरिके । साचपण जेणे एकें । नाना कल्लोळमाळिके । पाणी जेवीं ।।३४।। जे देखिजतेविणे । एकलें देखतेपण । हें असो आपणिया आपण । आपणचि जें ।।३५।। जें कोणाचें नव्हतोनि असणें । जें कोणाचें नव्हतां दिसणें । कोणाचें नव्हतां भोगणें । केवळ जो ।।३६।।**

---

सर्व दृश्य वस्तु पाहण्याची दृष्टि डोळ्याच्या ठिकाणीं आहे. पण तो स्वतःला बघण्याच्या बाबतींत अंधळाच ठरतो. कारण तो पाहणेंरूपच आहे. त्याच्या ठिकाणीं पाहणेंपणाचा व्यवहार होत नाहीं. त्याप्रमाणें परमात्मा हा ज्ञानरूप आहे म्हणून तो आपल्या ज्ञानाचा विषय होणें शक्य नाहीं. ३१. ज्या ज्ञानस्वरूप परमात्म्याच्या जवळ अज्ञान कालत्रयी नाहीं, तो स्वतः ज्ञानरूप असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं जाणण्याचा व्यवहार कसा होणार ? ३२. म्हणून केवळ मौन हेंच ज्याचें बोलणें, सर्व अनात्मवस्तूंचा परित्याग हीच ज्याची प्राप्ति, सर्व धर्मशून्य अशी परमात्मवस्तु ती जीव जेव्हां कोणत्याहि धर्मानें मुक्त नसेल तेव्हा प्राप्त होईल. ३३. किंवा अनंत ज्ञानाचे व्यवहार झाले तरी त्या सर्व व्यवहारसंबंधाला सत्यत्व देणारें जें एक ज्ञान असतें; जसें लाटांच्या अनंत मालिकेमध्यें पाणी एकरूपानें असतें. ३४. जें कोणाला दृश्य न होतां, स्वरूपानें द्रष्टेपणानें एकटें असतें त्या ज्ञानाच्या शब्दानें कितीसें वर्णन करावें ? तें अद्वितीय आहे, म्हणजे आपलें नातेवाईक आपणच. ३५. परमात्मवस्तु अस्तित्वरूपच असल्यामुळें तिचें अन्य दुसऱ्या कोणाच्या अस्तित्वावर नसतें; कोणाला विषय न होतां स्वतःच प्रकाशमान आहे आणि अन्य दुसऱ्या कोणत्याहि भोग्य पदार्थावांचून स्वरूपानें आनंदरूप आहे. ३६

**तथा पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा । चांगया मज तुज आपणयाचा । बोल ऐके ॥३७॥ ज्ञानदेव म्हणे । तुज माझा बोल ऐकणें । तें तळहाता तळीं मिठी देणें । जयापरि ॥ ३८ ॥ बोलेंचि बोल ऐकिजे । स्वादेंचि स्वाद चाखिजे । कां उजिवडें देखिजे । उजिडा जेंवीं ॥ ३९ ॥ सोनिया वरकल सोनें जैसा । कां मुख मुखा हो आरिसा । मज तुज संवाद तैसा । चक्रपाणि ॥४०॥ गोडिये आपुली गोडी । घेता काय न माये तोंडीं ? । आम्हां परस्परें आवडी । तो पाडु असे ॥ ४१ ॥ सखया तुझेनि उद्देशें । भेटावया जीव उल्हासे । कीं सिद्धभेटी विसकुसे । ऐशिया बिहे ॥ ४२ ॥**

चांगदेवा ! ज्या परमात्म्याला वटेश्वर इत्यादि अनेक नामें आहेत त्याचाच पुत्र तूं आहेस. अरे कापराचा कण हा कापूररूपच असतो ना ! तसा तं परमात्मास्वरूप आहेस. ! आत्म्यांत आणि परमात्म्यांत ऐक्य असतें. तुझ्या-माझ्यांत तसा ऐक्यभाव कोणत्या रीतींनें आहे तें तूं आतां ऐक. ३७. तूं परमात्मस्वरूप आहेस, मीहि तसाच परमात्मस्वरूप आहे. म्हणूनच तुझ्यांत व माझ्यांत अभेद आहे. (म्हणूनच म्हणतों) माझा उपदेश तूं ऐकायचा म्हणजे तुझा स्वतःचाच उपदेश ऐकण्यासारखें नाहीं का ? अरे (एखाद्याच्या) उजव्या हातानें त्याच्याच डाव्या हाताला मिठी घालावी तसें हें आहे. ३८. किंवा शब्दानें स्वतःचा शब्द ऐकावा, गोडीनें स्वतःची गोडी स्वतःच चाखावी, उजेडानें आपल्या स्वतःचा उजेड बघावा, तसें हें आहे ३९. अथवा सोन्याची कसोटी असावी; मुख हेंच आरसा म्हणून पाहण्यासाठीं उपयोगी आणावें, तसें चांगदेवा ! तुझ्या आणि माझ्या संवादाचें आहे. ४०. गोडीनें स्वतःचा गोडवा स्वतः अनुभवायचा म्हटलें तर तें अशक्य नाहीं ना ? अगदीं नेमका हाच प्रकार तुझ्या आणि माझ्या आनंदाबद्दल आहे. ४१. चांगदेवा ! मोठ्या उल्हासानें तुझी भेट घ्यायला माझा जीव उत्सुक झाला आहे हें तर खरेंच, पण आत्मतत्त्वाच्या दृष्टीनें स्वतःसिद्ध ही भेट उपाधिदृष्टीनें बिघडून जाईल कीं काय या भीतीनें मी शंकाकुल झालों आहे. ४२.

**घेवों पाहें तुझें दर्शन। तंव रूपा येवों पाहे मन। तेथें दर्शना होय अवजतन। ऐसें गमों लागे ॥ ४३ ॥ कांहीं करी बोले कल्पी। कां न करी न बोले न कल्पी। ये दोन्ही तुझ्या स्वरूपीं। न घेति उमसू ॥ ४४ ॥ चांगया ! तुझेनि नांवे। करणें न करणें न व्हावें। हें काय म्हणों परी न धरवे। मीपण हें ॥४५॥ लवण पाणियाचा थावो। माजी रिघोनि गेलें पाहो। तंव तेंचि नाहीं मा काय घेवो। माप जळा ॥४६॥ तैसें तुज आत्मयातें पाहीं। देखो गेलिया मीचि नाहीं। तेथें तूं कैचा काई। कल्पावया जोगा ॥४७॥ जो जागोनि नीद देखे। तो देखणेपणा जेंवि मुके। तेंवि तूंतें देखोनि मी ठाकें। कांहीं नहोनि ॥ ४८ ॥**

कारण तुझें दर्शन घ्यावें अशी इच्छा करतांच माझें मन आत्माकार व्हायला वेळ लागत नाहीं आणि मग त्या स्थितींत दर्शनाची कृतीच होणें नाहीं असें वाटतें. ४३ चांगदेवा! तूं एखादी चांगली कृति केलीस, बोललास, कल्पना केलीस, किंवा असें नाहीं जरी केलेंस (कर्म किंवा कर्माचा अभाव) तरी हे दोन्ही कांहीं तुझ्या मूळ आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं उत्पन्न होतच नाहींत. ४४. करणें किंवा न करणें हा व्यवहार चांगदेवा! स्वरूपाच्या ठायीं होत नाहीं. आत्मत्वाचा उपदेश तुला करतांना, माझ्या आत्म्याजवळ असलेला उपाधीचा मीपणासुद्धां नाहींसा होत आहे. ४५. चांगदेवा! पाण्याची खोली समजून घेण्यासाटीं मिठाच्या खड्यानें पाण्यात बुडी मारली तर तेथें मीठ कांहीं मिठाच्या रूपांत शिल्लक राहत नाहीं. मग त्या पाण्याची खोली मोजायची रे कोणी? ४६. तुझ्या यथार्थ आत्मस्वरूपाचा विचार करूं लागलों की माझा औपाधिक मीपणा नाहींसा होतो; मग मीपणाच्या कल्पनेनें येणाऱ्या तूंपणाची कल्पना तरी करतां येण्याजोगी आहे काय? ४७. एखादा माणूस झोप येतांना ती कशी येते, निद्रा हा कसला पदार्थ आहे हें जाणून घेण्याची इच्छा करतो; पण निद्रा कोणत्याहि पदार्थाच्या रूपानें त्याच्यापुढें आली नाहीं म्हणजे तो माणूस निद्रा जाणून घेण्याच्या भूमिकेसहि मुकतो, त्याप्रमाणें ज्ञानाचा विषय नसलेल्या स्वरूपाचा मीहि प्रमुख द्रष्टाच होऊन जातो. ४८.

**आंधाराचे ठाई । सूर्यप्रकाश तंव नाहीं । परी मी आहें हें कांहीं । नवचेंचि जेंवि ॥ ४९ ॥ तेंवि तूंतें मी गिंवसी । तेथें तूंपण मीपणेंसी । उखतें पडे ग्रासीं । भेटीचि उरे ॥ ५० ॥ डोळ्याचे भूमिके । डोळा चित्र होय कौतुकें । आणि तेणेंचि तो देखे । न डंडाळितां ॥ ५१ ॥ तैसी उपजतां गोष्टी । न फुटतां दृष्टी । मी तूंवीण भेटी । माझी तुझी ॥ ५२ ॥ आतां मी तूं या उपाधी । ग्रासूनि भेटी नुसधी । ते भोगिली अनुवादीं । घोळघोळं ॥ ५३ ॥ रुचतियाचेनि मिसें । रुचितें जेविजे जैसें । कां दर्पण व्याजें दिसे । देखतें जेंवि ॥ ५४ ॥ तैसीं अप्रमेयें प्रमेयें भरलीं । मौनाचीं अक्षरें भलीं । रचोनि गोष्टी केली । मेळियेचि ॥ ५५ ॥**

दाट अंधारात बसलें कीं, तेथें सूर्याचा प्रकाश मिळायच दूर राहतें , पण स्वतःचेंहि भान नाहींसें होतें. ४९. त्याप्रमाणें तुझ्या स्वरूपाचा विचार करतांना माझा, मींपणा व तुझा तूंपणा दोन्ही नाहींसें होऊन फक्त एक आत्मतत्त्व काय तें शिल्लक उरतें. ५०. बोटानें डोळा दाबला कीं, त्याच्या जोरावर आपल्याला चित्रविचित्र पदार्थ दृष्टीसमोर भासूं लागतात, पण हें दाखविणारा डोळा मात्र अनेकरूप होत नाहीं. आणि अनेकत्वाचा प्रकाश दाखविल्याखेरीज मात्र तो राहत नाहीं. ५१. त्याप्रमाणें आत्मैक्यामध्यें अभेदपणा प्राप्त होऊन तुझा माझा अभेद मात्र मी–तूंपणावांचून सिद्धच आहे. ५२. मीं व तूं या उपाधीस बाजूला करून आत्म्याच्या एकत्वानें मी जशी भेट घेतली (उपभोगली) व तिचा ऊहापोह केला, इतका वेळ ज्या स्थितींचा अनुवाद केला तशाच रीतीनें तूंहि स्वतःसिद्ध भेटीचा अनुभव घ्यावास. ५३. अन्न सेवन करणाऱ्याला पदार्थांचा स्वाद आवडला तर त्यांतील रस जेवणाऱ्याच्या रुचीला जेववूं लागतो म्हणजे रुचीचा उपयोग रुची हीच घेते किंवा पाहणाराच आरशाच्या मिषानें स्वतःस बघतो. ५४. अप्रमेय परमात्मा विषद करणारा आणि प्रमेयाचें साधन असा जो शब्द त्याला गिळून टाकणारीं अक्षरें गुंफून तुझ्या-माझ्यांतील ऐक्याचा हा संवाद लिहिला आहे. ५५.

**इयेचें करूनि व्याज । तूं आपणयातें बूझ । दीप दीपपणें पाहे निज । आपुलें जैसें ॥ ५६ ॥ तैसी केलिया गोठी । तया उघडिजे दृष्टी । आपणिया आपण भेटी । आपणामाजीं ॥ ५७ ॥ जालिया प्रळयीं एकार्णव । अपार पाणियाची धांव । गिळी आपुला उगव । तैसें करी ॥५८॥ ज्ञानदेव म्हणे नामरूपें । विण तुझें साच आहे आपणपें । तें स्वानंदजीवनपें । सुखिया होईं ॥ ५९ ॥ चांगया पुढत पुढती । घरा आलिया ज्ञानसंपत्ति । वेद्यवेदकत्वही अतीतीं । पदीं बैसें ॥६०॥ चांगदेवा तुझेनि व्याजें । माउलिया श्रीनिवृत्तिराजें । स्वानुभव रसाळ खाजें । दिधलें लोभें ॥ ६१ ॥**

स्वतःच्या प्रकाशानें दिवा आपलें स्वरूप उघड करतो, त्याप्रमाणें मी तुझ्या - माझ्यांतील एकत्वाची स्थिति लिहिली आहे, तिच्या साहाय्यानें तूं आपलें यथार्थ आत्मस्वरूप जाणून घ्यावेस म्हणजे 'मी ब्रह्मस्वरूप आहें' अशा बोधांत तू राहा. ५६. तुझा आत्मभाव स्पष्ट होईल अशा गोष्टी मी तुला सांगितल्या. त्यांच्या मदतीनें तूं ज्ञानदृष्टि मिळव. म्हणजे आपणच आपली भेट घे. चांगदेवा ! तूं योगेश्वर्ययुक्त असलास तरी त्याच्या सान्निध्यानें उदित होणाऱ्या 'अहं मम' या अध्यासाचा त्याग करून असंग कूटस्थ आत्मा म्हणजे मीच आहें याची निश्चिती करून घे. यामुळें आपण आपणांस भेटलों असें होतें. ५७. प्रलयाच्या वेळीं सगळीकडे पाणीच पाणी होतें, तें सर्व प्रवाहांचें उगम आणि प्रवाहसुद्धां नाहींसें करतें. त्याप्रमाणें तूं करावेंस, म्हणजे तूं स्वगत्, स्वजातीय, विजातीय, संबंधशून्य असें ब्रह्म मीच आहें, या दृढ निश्चयानें देशादिकांतील अनात्मभाव नाहींसा कर. ५८. चांगदेवा ! तुझा यथार्थ सच्चिदानंदात्मभाव हा नामरूपातीत आहे. त्या स्वानंदाच्या अनुभवानें तूं सुखरूप हो. ५९. हें ब्रह्मैक्यत्वाचें ज्ञान, वेद्यवेदकत्व इत्यादि भेदांच्या पलीकडे असणारें सच्चिदानंदस्वरूप प्राप्त करून देतें. त्याची तूं खूणगांठ बांध असें माझें तुला वारंवार सांगणें आहे. ६०. तुझ्या पत्राचें उत्तर लिहिणाच्या मिषानें माझ्या श्रीगुरुनिवृत्तिराज चांगदेवा! माउलीने माझ्याकडून तुला उपदेश करविला असे नाहीं,तर मोठ्या लोभानें रसभरित आत्मानंदाचा मलाद खाऊ दिला.

**एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही डाळस आरिसे । परस्पर पाहता कैसे । मुकले भेदा ! ॥ ६२ ॥ तियेपरी जो इया । दर्पण करील ओंविया । तो आत्माएवढिया । मिळेल सुखा ॥ ६३ ॥ नाहीं तेंचि काय नेणों असे । दिसे तेंचि तैसें नेणों दिसे । असे तेंचि नेणों आपैसें । तें कीं होइजे ॥ ६४ ॥ निदेपरौतें निदैजणें । जागृति गिळोनि जागणें । केलें तैसें गुंफणें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ६५ ॥**

**॥ श्रीचांगदेवपासष्टी समाप्त ॥**

**॥ श्रीविठ्ठलार्पणमस्तु ॥**

---

चांगदेव, ज्ञानेश्वर महाराजांच्या या पत्रानें ज्ञानसंपन्न झाले. महाराज तर ज्ञानरूप होतेच. त्यांची दोघांची ज्ञानदृष्ट्या भेट घडतांच दोघेहि, शरीरधर्मानें येणारे भेद नाहींसे होऊन अभेद झाले. ६२. ब्रह्मात्मैक्यज्ञान प्राप्त होण्यासाठीं जो कोणी, आम्हीं चांगदेवास केलेल्या या उपदेशाचा सतत विचार करील तो आनंदरूपच होईल. ६३. आत्म्यासंबंधी तो असा आहे तसा आहे, एवढा आहे, असें कांहींच सांगता येत नाहीं. तें सद्रूप प्रकाशमय, अपरिमित आनंदानें सर्वत्र ओतप्रोत असूनहि अल्पबुद्धीच्या लोकांना तें कोठेंहि दिसत नाहीं हेंहि एक आश्चर्य नव्हे काय ! ६४. देहामुळें उत्पन्न होणाऱ्या निद्रेपलीकडचे निर्विकार परमात्मस्वरूप, देह-विषयक विचारांचा नाश करणारी आत्मजागृति, त्या परमात्म्याचें एकत्व या ग्रंथांत विशद केलें आहे, असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ६५.

**॥ ॐ तत्सत् ॥**

